


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७० । अंक ५ । फेब्रुवारी २०१७
माघ/फाल्गुन शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

प्राज्ञपाठशाळामंडळ
अध्यक्ष व विश्वस्त :
सरोजा भाटे

संपादक :
श्री. मा. भावे

संपादक मंडळ :
यशवंत कळमकर
अशोक कृष्णाजी जोशी

संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## फेब्रुवारी २०१७

## अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मराठा मूक मोर्चा : काही संदर्भ

अंकुश पाराजी आबारे

**"भारताने स्वीकारलेल्या नव्या आर्थिक धोरणाला २०१६ मध्ये २५ वर्षे पूर्ण झाली. या धोरणातून जागतिकीकरणाच्या प्रक्रियेला चालना मिळाली. जग जवळ आणणा-या या प्रक्रियेमुळे जगात घडणा-या घटनांचा प्रभाव स्थानिक पातळीवर होऊ लागला, तर स्थानिक घटनांचे पडसाद आंतरराष्ट्रीय पातळीवर पडू लागले. अमेरिकेत कोणाला शिंक आली, तर भारतात अनेकांना सर्दी होऊ लागली. परस्पर आंतरक्रियेतून एक नवी परस्परावलंबी प्रक्रिया उदयास आली. जागतिकीकरणामुळे अनेकांचा फायदा झाला असला, तरी अनेक समूह या निर्दयी प्रक्रियेत भरडले गेले. राष्ट्रांमधीलअंतर कमी करणा-या या प्रक्रियेमुळे खरा अत्याचारी कोण आहे, हेच शोषितांना कळेनासे झाले. त्यामुळे स्वत:वरील अन्यायाला अन्य समूह, जो सभोवताली आहे, त्याला जबाबदार धरण्याची वृत्ती वाढली. जागतिकीकरणाने आर्थिक विषमता वाढविली तसेच जगणेही अवघड केले. अस्तित्वाच्या लढ्यासाठी सर्वच समूह वेगवेगळ्या मार्गांनी निषेध व्यक्त करत आहेत, अदृश्य असणा-या शत्रूविरोधात लढत आहेत. कोपर्डीतील घटनेने महाराष्ट्रातील मराठा समाज रस्त्यावर आला. निमित्त जरी कोपर्डी असले, तरी त्यामागील भौतिक कारणे वेगळी आहेत. त्या कारणांचा वेध या लेखात घेतलेला आहे."**

मराठा समाजाने ऑगस्ट २०१६ पासून महाराष्ट्रातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये लाखोच्या संख्येने मूक मोर्चे काढले. मराठा जातीला शिक्षण आणि नोक-यांमध्ये आरक्षण, शेतमालाला स्वामीनाथन आयोगाच्या शिफारशींनुसार बाजारभाव, अॅट्रॉसिटी कायद्यात सुधारणा, कोपर्डी प्रकरणातील आरोपींना फाशीची शिक्षा आदी मागण्यांसाठी हे मोर्चे काढण्यात आले. कोणत्याही प्रस्थापित राजकीय नेत्यांच्या किंवा राजकीय पक्षांच्या प्रत्यक्ष सहभागाशिवाय आयोजित केलेल्या या मोर्चांना मराठा समाजातून उदंड प्रतिसाद लाभला. लोकशाही व्यवस्थेत शांततामय मार्गाने निषेध करण्याच्या दिलेल्या हक्काचा सनदशीरपणे वापर करून लाखो नागरिक शांततेने निषेध व्यक्त करत होते. मूक मोर्चांना मिळालेल्या उत्स्फूर्त पाठिंब्यावरून मराठा समाजातील असंतोषाची तीव्रता लक्षात येतो.

महाराष्ट्र राज्याची निर्मिती (१९६०) झाली तेव्हा मराठा जातीकडे शेतजमिनीची मालकी, संख्यात्मक ताकद आणि स्थानिक अर्थकारणावर नियंत्रण होते. त्यामुळे महाराष्ट्रात मराठा जात वर्चस्वशाली जात मानली गेली. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा महाराष्ट्रातील बहुसंख्य (७३ टक्के) समाज हा ग्रामीण भागात राहत होता. ग्रामीण भागातील जनतेची उपजिविकेची साधने शेतकी क्षेत्राशी निगडीत होती. ग्रामीण भागातील मराठेतर जातींना उपजिविकेसाठी शेती करणा-या मराठा कुटुंबावर अवलंबून रहावे लागत असल्याने राजकारणात या जाती मराठा जातीला विरोध करत नसत. शेतीशी निगडीत आर्थिक हितसंबंधामुळे मराठेतरांचा पाठिंबा मराठा जातीतील राजकीय नेत्यांना मिळत असे. त्यामुळे राज्यात मराठा वर्चस्व निर्माण झाले होते. त्यामुळे शेतजमिनीची मालकी असलेली आणि संख्यात्मकदृष्ट्या सर्वात मोठी (३१ टक्के - १९३१ च्या जनगणनेनुसार) जात असल्याने महाराष्ट्रामध्ये मराठा जातीकडे लोकशाहीच्या नियमानुसार राजकीय सत्ता आली. राजकारणावरील वर्चस्व टिकविण्यासाठी आणि ते वृद्धिंगत करण्यासाठी मराठा नेतृत्वाने काही महत्त्वाची धोरणे राबविली. सहकाराला प्रोत्साहन, शेतीसाठी जलसिंचन वाढविण्यासाठी धरणबांधणीचे धोरण आखून महाराष्ट्राच्या ग्रामीण अर्थव्यवस्थेवर मराठा जातीचे नियंत्रण पक्के करण्यासाठी प्रयत्न केले गेले (पळशीकर; २००३:२१). यशवंतराव चव्हाणांनी स्थानिक स्वराज्य संस्था आणि सहकारी संस्थांचे जाळे महाराष्ट्रात उभे केले. या संस्थांच्या




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उभारणीमुळे महाराष्ट्रात काँग्रेस पक्षाची सत्ता बळकट झाली. महाराष्ट्रातील तत्कालीन काँग्रेसमध्ये बहुसंख्य मराठा जातीचे नेतृत्व असल्याने काँग्रेसची सत्ता म्हणजेच मराठा जातीचीच सत्ता असे समीकरण तयार झाले महाराष्ट्रातील काँग्रेस नेतृत्वाने इतर जातींनादेखील सत्तेत सामावून घेतल्याने मराठा जातीच्या वर्चस्वाच्या पोटात बहुजातीय अभिजन सुखाने नांदू शकले (पळशीकर; २००७:३६). राजकीय भरती करण्यासाठी आवश्यक असलेली अनेक सत्तास्थाने महाराष्ट्रात निर्माण केली गेली. त्यामुळे राजकीय महत्त्वकांक्षा असणा-या नव्या नेतृत्वाला काँग्रेसमध्ये सत्ता मिळण्याची संधी मिळाली. जिल्हा परिषद, पंचायत समिती आणि सहकारी संस्था या स्थानिक संसाधनांवर नियंत्रण असणा-या संस्था बनल्या. ही सत्तास्थाने मराठा राजकीय अभिजनांनी काबीज केली. संस्थात्मक यंत्रणांची निर्मिती आणि संख्यात्मक ताकदीच्या बळावर महाराष्ट्रात मराठा जातीकडे राजकीय सत्ता स्थिरावली. त्यातून राज्यात राजकीय सत्ता असलेली वर्चस्वशाली जात म्हणून मराठा जात ओळखली गेली.

१९५०-६० च्या दशकातील अर्थ आणि समाजकारणाने महाराष्ट्रात मराठा जातीला राजकीय सत्ता मिळवून दिली. देशाच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय परिस्थितीत गेल्या ७० वर्षांत प्रचंड बदल झालेले आहेत. महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीच्या वेळी शेतकी क्षेत्राचा राज्याच्या अर्थव्यवस्थेतील वाटा ३१.४ टक्के होता तो २०१३-१४ मध्ये घटून ११.७६ टक्के झाला आहे (महाराष्ट्राचे आर्थिक सर्वेक्षण २०१३-१४). राज्याच्या एकूण उत्पन्नातील सेवा क्षेत्राचा वाटा सर्वाधिक म्हणजे ६२.९ टक्के आहे. राज्याच्या अर्थकारणातील शेतकी क्षेत्राचा हिस्सा आणि महत्त्व कमी झालेले आहे. शेतकी क्षेत्राखेरीज इतर अनेक उद्योग-व्यवसायांची निर्मिती १९९० नंतरच्या नव्या आर्थिक धोरणांमुळे झालेली आहे. ग्रामीण भागातील शेतीवर आधारित असलेल्या मराठेतर कुटुंबांना उपजीविकेसाठी इतर नवी साधने उपलब्ध झाली. त्यामुळे या जातींचे मराठा जातीवरील अवलंबन कमी झाले. निवडणुकीच्या राजकारणामुळे समाजातील तळागाळातील समूहांचे राजकीय आत्मभान वाढले. मराठेतर समाजातील समूहांच्या राजकीय अस्मिता वाढल्याने त्यांनी राजकीय सत्तेत वाटा मागितला. त्यातून मराठा राजकीय अभिजनांना आव्हान निर्माण झाले आहे.

१९६० च्या दशकात महाराष्ट्रातील ७३ टक्के जनता ग्रामीण भागात राहत होती. ग्रामीण भागात राहणा-या जनतेचे प्रमाण २०१३-१४ मध्ये घटून ५५ टक्के झाले आहे. २००२ साली नेमलेल्या परिसिमन आयोगाच्या शिफारशींनुसार राज्यातील निव्वळ शहरी मतदार संघांची संख्या ९२ आणि निमशहरी मतदारसंघांची संख्या ३१ झालेली आहे. शहरी मतदारसंघाचे प्रमाण २००४ पर्यंत झालेल्या निवडणूकांमध्ये केवळ ७१ होते तर तब्बल २१७ मतदारसंघ ग्रामीण होते (पवार; २००९:२३). शहरीकरण आणि मतदारसंघ पुनर्रचनेमुळे शहरी मतदारसंघांची संख्या वाढली. शहरांवर ज्या पक्षाचा प्रभाव अधिक त्या पक्षाला विधानसभेत सत्ता मिळविण्याची संधी अधिक, असे समीकरण २००९ नंतर निर्माण झाले. त्यामुळे राजकीय पक्ष शहरी हितसंबंधांना प्राधान्य देत आहेत. राज्याच्या राजकीय सत्तेच्या चाव्या मुंबई, पुणे, नाशिक, ठाणे अशा प्रमुख शहराकडे आल्या आहेत. शहरी मतदारांचे हितसंबंध जोपासणा-या भाजप आणि शिवसेनेचा त्यामुळे राज्यात प्रभाव वाढला आहे. २०१४ च्या निवडणूकीत भाजपने जिंकलेल्या १२२ जागांपैकी निम्या जागा या मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक या शहरातील आहेत (हिंदुस्तान टाईम्स, २२ ऑक्टोबर २०१४). शहरी मतदारसंघांची संख्या वाढल्याने शहरी हितसंबंधाना राज्यकर्त्यांकडून प्राधान्य मिळत आहे. त्यामुळे राज्याच्या राजकारणात ग्रामीण विरुद्ध शहरी हितसंबंध असा संघर्ष निर्माण झालेला आहे. राज्यात शेतकी हिसंबंधांना दुय्यम स्थान मिळत आहे. त्यामुळे शेतकी क्षेत्राशी निगडीत राजकारण करणा-या समूहांच्या राजकारणालादेखील आव्हान मिळत आहे. शहरी लोकसंख्येत झालेली वाढ, शेतकी क्षेत्राचा अर्थव्यवस्थेतील घटलेला वाटा, सेवा क्षेत्राची झालेली वाढ, मराठेतर समूहांतील वाढलेले राजकीय आत्मभान आणि शहरी मतदासंघांची झालेली वाढ आदी कारणांमुळे राज्यात मराठा वर्चस्वाला आव्हान मिळाले. १९९० नंतर देशाने स्वीकारलेल्या नव्या आर्थिक धोरणांमुळे पारंपरिक आर्थिक संरचना मोडकळीस आल्या. जुने आर्थिक हितसंबंध संपुष्टात आल्याने त्याभोवती



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निर्माण झालेले राजकारणदेखील बदलते. त्यामुळे राज्यातील मराठा वर्चस्वाला २१ व्या शतकात आव्हाने मिळालेली आहेत.

महाराष्ट्रात निघालेल्या विराट मराठा मोर्चातून जरी सकल मराठा समाजाची एकी दर्शविण्याचा प्रयत्न झालेला असला, तरी मराठा समाजात वर्गीय स्तरीकरण प्रचंड प्रमाणात झालेले आहे. कुमार केतकरांच्या मते (२०१६) मराठा समाज चार वर्गांमध्ये विभागलेला आहे. राजकीय सत्ताधारक अभिजन वर्ग, मोठे बागायतदार, छोटे शेतकरी, शेवटचा आणि सर्वात तळाशी असलेला म्हणजे भूमिहीन शेतमजूर असलेला मराठा वर्ग होय. आनंद तेलतुंबडे (२०१६) यांनी मराठ्यांची विभागणी गढीवरचा, वाड्या-वरचा आणि वाडीवरचा अशी केलेली आहे केतकर आणि तेलतुंबडे यांनी केलेल्या वर्गवारीमध्ये केवळ शेतजमिनीची मालकी आणि राजकीय सत्ता यांच्या संबंधाचा विचार केलेला आहे. गेल्या साठ वर्षातील राजकीय सत्ता आणि १९९० च्या दशकातील अर्थकारणाने मराठा समाजामध्ये निर्माण झालेल्या नव्या वर्गाची मांडणी त्यामध्ये नाही. प्रकाश पवारांच्या मांडणीत जागतिकीकरण आणि सेवा क्षेत्राच्या विस्तारातून निर्माण झालेल्या मध्यम वर्गाचा उल्लेख आहे. (२०१६).

राज्यातील राजकीय सत्तेवरील वर्चस्व आणि जागतिकीकरणाच्या प्रभावातून मराठा समाजामध्ये तीन वर्ग निर्माण झालेले आहेत. या वर्गांचे हितसंबंध वेगवेगळे आहेत. मराठा समाजातील हे तीन वर्ग म्हणजे - राजकीय सत्ताधारक असलेला राजकीय अभिजन वर्ग, सेवा क्षेत्राने निर्माण केलेल्या संधीचा फायदा करून निर्माण झालेला मध्यमवर्गीय मराठा वर्ग आणि अल्पभूधारक किंवा भूमिहीन संख्येने अधिक असलेला मराठा बहुजन वर्ग, जो सर्वच बाजूंनी राजकीय आणि आर्थिक व्यवस्थेचा बळी ठरलेला आहे.

राज्यातील राजकीय सत्तेचा फायदा उठवीत मराठा राजकीय अभिजन वर्गाने स्वतःचे आर्थिक हित साधले आहे. सहकार क्षेत्रातून राजकीय सत्तेचा मार्ग जातो याची जाणीव मराठा अभिजनांना झाल्याने त्यांनी या संस्थांवर लक्ष केंद्रित केले. राजकीय अनुग्रह निर्माण करण्यासाठी या संस्थांचा वापर केला. ग्रामीण भागाचा कायापालट करणा-या सहकार क्षेत्राला १९८० नंतर भ्रष्टाचार आणि घराणेशाहीने घेरले. या सहकारी संस्था केवळ त्या त्या भागातील राजकीय अभिजनांनी स्वतःसाठी राखून ठेवलेली कुरणे बनली. या संस्थांमधून राजकीय अभिजनांनी मोठ्या प्रमाणात पैसा मिळविला. तो इतर क्षेत्रांमध्ये वळविला. समाजहित बाजूला सारून या संस्थांचा वापर स्वहित साधण्यासाठी केला गेला. सहकारी संस्थांबरोबर ग्रामीण भागात सुरू झालेल्या शैक्षणिक संस्थांच्या माध्यमातून ग्रामीण जनतेचा विकास होणे अपेक्षित होते. परंतु या संस्थातून शिक्षण सम्राट निर्माण झाले. सहकारी संस्थांनी शिक्षण संस्था निर्माण केल्या परंतु या संस्थांमध्ये स्थानिक विद्यार्थी कमी आणि डोनेशन देणारे बाहेरील उच्चवर्गातील विद्यार्थी जास्त अशी स्थिती निर्माण झाली. सहकारातून ग्रामीण राज्यकर्ते सहकार सम्राट आणि शिक्षण सम्राट बनले. त्यांच्या कृतीतून ग्रामीण जनतेचे हित बाजूलाच राहिले परंतु, मराठा समाजातील बहुसंख्य असलेल्या गरीब वर्गाच्या कल्याणाकडे त्यांनी दुर्लक्ष केले. एवढेच नाही तर या शिक्षणसंस्थांमध्ये शिक्षण घेऊन आलेल्या मराठा जातीच्या गरीब वर्गातील युवकांकडून नोकरीसाठी मोठ्या प्रमाणात डोनेशन्स घेतली गेली. काहींना अनेक वर्षे नोकरी देण्याच्या आश्वासनावर राबवत ठेवले. त्यामुळे राजकीय अभिजन वर्ग आणि सर्वसामान्य बहुजन मराठा यामध्ये दरी वाढत गेली.

सहकारी संस्थांना व्यावसायिक पद्धतीने न चालविल्याने आणि भ्रष्टाचारामुळे या संस्था तोट्यात गेल्या. खाजगीकरण आणि नव्या आर्थिक धोरणांच्या पुरस्कारामुळे सहकार क्षेत्राला व्यावसायिक स्पर्धेला सामोरे जावे लागले. त्यातून या संस्था बाजारपेठीय स्पर्धेत टिकू शकल्या नाहीत. एकेकाळी सत्तेचा मार्ग असलेल्या या संस्था सध्या अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी झगडत आहेत. सहकारी संस्थांचा -हास होत असताना सहकारातील राजकीय अभिजनांचे वैयक्तिक नशीब मात्र जोरात आहे. अनेकांनी सहकारातून आलेला पैसा अर्थव्यवस्थेच्या उदारीकरणाने निर्माण केलेल्या क्षेत्रांमध्ये गुंतविला. त्यामुळे एका बाजूला सहकारी संस्थांचा -हास होत होता. परंतु सहकार सम्राटांनी मात्र जागतिकीकरणाचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुरेपूर फायदा उठवीत स्वतःला उद्योजक म्हणून प्रस्थापित केले आहे. राजकीय सत्तेतून मिळणा-या माहितीचा फायदा घेत या वर्गाने राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावरील आर्थिक संधींचा लाभ घेतला. बहुसंख्य शेतकरी मराठा समाज जागतिकीकरणाचे चटके सहन करीत असताना मराठा अभिजन मात्र तिच्यातील संधीमुळे आर्थिकदृष्ट्या अधिक सामर्थ्यशाली बनला.

मराठा जातीतील बहुतांशी बड्या नेत्यांनी आपल्या घरातील व्यक्तींनाच राजकीय वारस बनविल्याने नवे नेतृत्व निर्माण होण्याची प्रक्रिया थंडावली. सत्ता सहजरीत्या मिळाल्याने दुस-या पिढीतील राजकीय अभिजनांमधील मुजोरी वाढली. सर्वसामान्यांपासूनची त्यांची नाळ तुटली. एका बाजूला बहुसंख्य समाजात लोकशाहीची मूल्ये रुजत असताना राजकीय नेत्यांची सरंजामीवृत्ती वाढत गेली. त्यामुळे मराठा समाज आणि मराठा अभिजनांमधील दरी वाढत गेली. मराठा अभिजनांकडे असलेल्या राजकीय सत्तेचा आणि सहकार क्षेत्रातील वर्चस्वाचा फायदा सर्वसामान्य कष्टकरी मराठा वर्गाला झाला नाही.

१९९० नंतरच्या आर्थिक उदारीकरणामुळे देशात आणि राज्यात प्रभावी अशा मध्यमवर्गाची निर्मिती झाली. मराठा जातीमध्येही असा मध्यमवर्ग निर्माण झाला. पत्रकार, डॉक्टर, इंजिनिअर, प्राध्यापक, व्यवस्थापक, शिक्षक, खाजगी आस्थापनांमध्ये काम करणारे, सरकारी नोकरदार, वकील, न्यायाधीश असा विविध कृषिव्यतिरिक्त क्षेत्रांमध्ये असलेला नवा मध्यम वर्ग मराठा समाजामध्ये निर्माण झाला. अर्थव्यवस्थेच्या उदारीकरणानंतर रोजगाराच्या नवीन संधी निर्माण झाल्या. या संधीचा फायदा घेत मराठा समाजामध्ये मध्यमवर्ग निर्माण झाला. शेतीतून आलेला परंतू शेतीशी निगडीत नसलेल्या अर्थव्यवस्थेमुळे निर्माण झालेला हा वर्ग आहे.

१९९० नंतर विविध जातींमध्ये संघटनाची निर्मिती झाली होती. जातीच्या आधारावर विविध छोट्या-मोठ्या जाती एकत्र येऊन राज्यसंस्थेवर प्रभाव टाकण्याचा प्रयत्न करत होत्या. काही जातीतील लोक नोकरीच्या ठिकाणी अडचणीत आल्यास जातीय संघटनांचा आधार घेऊन संकटावर मात करत होते. या सर्व घटनांचे निरीक्षण हा वर्ग करत होता. आपणही संघटित असावे, आपल्या जातीचीही संघटना असावी याची जाणीव आणि आवश्यकता या वर्गाला जाणवत होती. लोकशाही शासनव्यवहारामध्ये संघटित झाल्यास राज्याच्या संसाधन वाटप करण्याच्या प्रक्रियेवर प्रभाव टाकता येतो याची जाणीव या वर्गाला झाल्याने संघटनांची आवश्यकता जाणवू लागली. अल्पसंख्यांक असलेल्या समाजाला संघटित करणे तुलनेने सोपे असते परंतु बहुसंख्य असलेल्या समाजाला संघटित करणे अवघड असते. माहिती तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात झालेल्या आमूलाग्र बदलाने मराठा समाजाची ही अडचण दूर झाली. समाज माध्यमांतून महाराष्ट्रातील मराठा जातीच्या नागरीकांना एकत्र आणणे आणि संघटित करणे शक्य झाले. लाखोंच्या संख्येने निघालेल्या मोर्चाच्या यशामध्ये मध्यम वर्गीय मराठा समाजाने बजावलेली भूमिका महत्त्वपूर्ण ठरली.

नव्या अर्थव्यवस्थेने मराठा समाजामध्ये वर्गीय स्तरीकरण निर्माण केले आहे. मराठा मध्यम वर्ग आणि राजकीय अभिजन वर्ग यामध्ये मराठा समाजाचे नेतृत्व करण्यावरून संघर्ष निर्माण झालेला आहे. मध्यमवर्गीय मराठा समाजाच्या हस्तक्षेपामुळे मराठा मोर्चांना प्रचंड प्रमाणात यश मिळाले. या मोर्चाची सर्व सूत्रे मराठा मध्यम वर्गाने निर्माण केलेल्या मराठा मूक मोर्चा समन्वय समितीकडे होती. या समितीमध्ये जिल्ह्यातील डॉक्टर, वकील, प्राध्यापक आदी मध्यमवर्गीय नोकरदारांचा समावेश होता. मराठा मध्यम वर्ग आणि मराठा राजकीय अभिजन यांमध्ये मराठा समाजाचे नेतृत्व करण्यावरून सुप्त संघर्ष सुरू झाल्याचे दिसते. मराठा राजकीय अभिजनांनी सत्तेचा वापर केवळ स्वहितासाठी केल्याची भावना या वर्गात निर्माण झालेली आहे. त्यामुळे कोणत्याही ठिकाणच्या मोर्चांमध्ये राजकीय नेत्यांना मोर्चांची सूत्रे हाती घेऊ दिली नाही (टाईम्स ऑफ इंडिया, दि. २९ ऑक्टोबर २०१६). या राजकीय नेतृत्वाकडून आर्थिक आणि इतर स्वरूपाची मदत घेण्यात आली परंतु त्यांना मोर्चाचे नेतृत्व घेऊ दिले नाही. तर त्याच वेळी मराठा राजकीय अभिजनांची अवस्था अडचणीची झाली होती. मोर्चात सहभागी व्हावे तर मराठेतरांचा पाठिंबा गमावण्याची भिती, नाही सामील व्हावे तर मराठा समाजाचा रोष ओढण्याची भिती, त्यामुळे या मोर्चामध्ये राजकीय नेते



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाईलाजास्तव सामील होत होते. तळागाळातील कष्टकरी मराठा वर्गाला सोबत घेऊन मराठा मध्यम वर्गाने या मोर्चामध्ये यश मिळविले आहे.

मराठा समाजातील संख्येने सर्वाधिक असलेला आणि राजकीय व्यवस्थेचा आणि बदललेल्या अर्थकारणाचा बळी ठरलेला अल्पभूधारक किंवा भूमिहीन शेतमजूर असलेला मराठा बहुजन वर्ग या मोर्चामध्ये हिरीरीने भाग घेताना दिसतो. नोकरी आणि शिक्षणामधील आरक्षणामुळे आपली परिस्थिती सुधारेल अशी आशा या वर्गाला वाटत आहे. बहुजन मराठा वर्गाची आर्थिक आणि सामाजिक परिस्थिती इतर समाजघटकांपेक्षा फारशी वेगळी नाही. अल्पभूधारक किंवा भूमिहीन असलेल्या या समाजाला शेतीशी निगडीत कामे करण्याखेरीज गत्यंतर नाही. खेडे आणि शेती सोडून वेळीच शहरात न आल्याने शहरात निर्माण होणा-या संधी या वर्गाने गमावल्या आहेत. असंघटित क्षेत्रात काम करून उपजीविका भागवून शहरात भणंग जीवन जगण्याव्यतिरिक्त कोणताही पर्याय या वर्गाकडे राहिलेला नाही. ग्रामीण भागात तुटपुंज्या उत्पन्नात हा वर्ग कसेबसे जीवन जगत आहे. राजकीय अभिजनांनी केवळ जातीय अस्मिता दाखवून निवडणूकीच्या वेळी पाठिंबा मिळविला परंतु या वर्गाच्या विकासासाठी विशेष प्रयत्न केले नाहीत. संस्थात्मक वित्तीय संस्थांकडून कर्ज न मिळाल्याने सावकाराच्या पाशात हा वर्ग अडकलेला आहे. उत्पन्नाची हमी नाही त्यातच खाजगी सावकारीचा विळखा यामुळे या समूहात हतबलता आलेली आहे. त्यातच शेतमालाच्या आदानांच्या (खते, किटकनाशके, बियाणे) किंमतीत वाढ होणे आणि शेतमालाला किंमत नसणे, पर्जन्यावर आधारित शेती आदी कारणांमुळे या वर्गाची विपन्नावस्था वाढत चाललेली आहे. शासकीय धोरणात शेतकी क्षेत्राला प्राधान्य नसल्याने या वर्गाच्या समस्यांत वाढ होत आहे. या गंभीर पेचातून बाहेर पडण्याची कोणतीही आशा या वर्गाला दिसत नाही. महाराष्ट्रात आणि केंद्रात सत्तेत असलेल्या भाजप शासनाच्या धोरणात तर शेतकी हितसंबंधांना दुय्यम स्थान आहे. महाराष्ट्रात २०१५ आणि २०१६ मध्ये भयंकर दुष्काळ पडूनदेखील शासनाने शेतक-यांना कोणत्याही प्रकारची कर्जमाफी दिली नाही. याच सरकारने सत्तेवर आल्यानंतर राज्यातील रस्त्यांवर टोलमाफी मात्र जाहीर केली होती. यावरून सद्यकालीन सत्ताधारी कोणत्या वर्गाचे हितसंबंध जोपासतात याची जाणीव होते.

बहुजन मराठा वर्गामध्ये शिक्षणाबाबत मोठी जागृती झालेली दिसते. शिक्षण हे सामाजिक आणि आर्थिक उत्कर्षाचे एक साधन आहे याची जाणीव या वर्गाला झालेली आहे. त्यामुळे कुटुंबातील मुलांच्या शिक्षणासाठी हा वर्ग आग्रह धरताना दिसतो. शासनाच्या शिक्षणाविषयक धरसोडवृत्तीमुळे या क्षेत्राचा खेळखंडोबा झालेला आहे. शिक्षणाच्या खाजगीकरणाने गुणवत्तापूर्ण शिक्षण सर्वसामान्यांच्या आवाक्यात राहिलेले नाही. शिक्षण आणि इंग्रजी येणे ही काळाजी गरज असल्याचे चित्र निर्माण झाल्याने ग्रामीण भागात कोणतीही गुणवत्ता नसलेल्या खाजगी इंग्रजी माध्यमांच्या शाळा सुरू झाल्या. या शाळांना कोणताही दर्जा नाही. इंग्रजी माध्यमातील या शाळांमध्ये काम करणा-या शिक्षकांना दोन ते पाच हजाराच्या दरम्यान वेतन दिले जाते. त्यामुळे त्यांच्याकडून फारशा दर्जाची अपेक्षा ठेवणे रास्त नाही. इंग्रजी शाळांच्या प्रसारामुळे ग्रामीण भागातील दर्जेदार मराठी माध्यमांच्या शाळा बंद पडत आहेत. इंग्रजी आली म्हणजे नोकरी लागेल या धारणेने अनेकांना पछाडलेले असल्याने इंग्रजी माध्यमांच्या शाळांच्या कच्छपी अनेक पालक लागत आहेत. त्यातून अनेक पाल्यांचे भविष्यात नुकसान होणार आहे. मराठा बहुजन वर्गातील अनेकांनी तर खर्चांना कात्री देऊन आपल्या पाल्यांचा कोणताही दर्जा नसलेल्या इंग्रजी माध्यमांच्या शाळांमध्ये प्रवेश घेतलेला आहे. ही या वर्गाची शुद्ध फसवणूक आहे.

भौतिक प्रगती करण्याचे शिक्षण हे एकमेव साधन असल्याने उच्च शिक्षण घेण्याचा सर्व समाजघटकांचा कल वाढलेला आहे. जागतिकरणाच्या काळात तंत्रज्ञान वेगाने बदलत आहे. नवी नवी कौशल्ये असलेल्या शिक्षणाची आवश्यकता सातत्याने भासत आहे. आज हमखास नोकरी मिळवून देणारा अभ्यासक्रम काही वर्षातच केवळ बेराजगार निर्माण करणारा कारखाना तयार होतो. त्यामुळे कोणत्या वेळी कोणते शिक्षण घेतले पाहिजे याची माहिती असेल तरच आजच्या वेगाने बदलणा-या काळात शिक्षण घेणा-याचा फायदा आहे. ही माहिती


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शहरात राहणा-या वर्गाला ग्रामीण भागात राहणा-या वर्गापेक्षा अधिक असते. त्यामुळे ग्रामीण भागातील मराठा बहुजन वर्गात शिक्षणाबाबत जरी कमालीची जागृकता वाढली असली, तरी कोणते शिक्षण घ्यावे याबाबत हा वर्ग अनभिज्ञ आहे. त्यामुळे ज्या शिक्षणाला बाजारपेठेत काहीही किंमत नाही असे शिक्षण या वर्गातील युवक घेताना दिसतात. गेल्या दशकात मराठा समाजातील बहुतांशी युवकांनी शिक्षकाची नोकरी लागेल या अपेक्षेने शिक्षणशास्त्र (बी. एड.) या विषयाची पदवी घेतली होती तर आज इंजिनिअरींगचे वलय कमी होत असताना ग्रामीण भागात निर्माण झालेल्या खाजगी इंजिनिअरींग महाविद्यालयांतून मराठा समाजातील बहुजन वर्गाचे तरुण ही पदवी घेत आहेत. या महाविद्यालयांना कोणताही दर्जा नाही. केवळ पैसा कमविण्याच्या उद्देशाने ही महाविद्यालये सुरू झालेली आहे. शैक्षणिक क्षेत्रातील नियामक यंत्रणांच्या अपयशामुळे ग्रामीण भागातील गरीबांच्या आयुष्याशी खेळणा-या आणि त्यांना कोणतेही भवितव्य न देऊ शकणा-या या संस्था ग्रामीण भागातील जनतेची फसवणूक करत आहेत. या संस्थातून पदवी मिळालेल्यांना नोकरी मिळत नाही. कालबाह्य शिक्षण घेतल्याने त्याचा बाजारपेठीय व्यवस्थेत उपयोग होत नाही. त्यामुळे खाजगी क्षेत्रात नोकरी मिळत नाही. बेरोजगारी वाढत जाते. शिक्षणातून होणा-या उर्ध्वगामी स्थित्यंतराला मर्यादा येतात. अशा गर्तेत ग्रामीण भागातील मराठा समाजातील युवक सापडलेला आहे.

बहुजन मराठा समाजातील बहुतांशी युवक हे कुटुंबातील पहिल्यांदा शिकणारे युवक आहेत. तंत्रज्ञानात झपाट्याने बदल होण्याच्या काळात केवळ पदवी ही नोकरी मिळविण्यसाठी आवश्यक ठरत नाही. पदवीबरोबर इतर कौशल्ये (सॉफ्ट स्किल्स्) असणे आवश्यक असते. ही कौशल्ये अर्जित असतात तर काही कौशल्ये ही कुटुंबातील सांस्कृतिक भांडवलामुळे मिळतात. त्यामुळे ग्रामीण भागात राहणा-या मराठा समाजातील युवकांमध्ये ही कौशल्ये आत्मसात करण्यासाठी विशेष प्रयत्नांची आवश्यकता असते. ते प्रयत्न वेळीच न झाल्याने स्पर्धात्मक बाजारपेठेतून हा युवक बाहेर फेकला जातो. पदवी आहे परंतु नोकरी नाही, अशा अवस्थेत तो सापडतो. सेवा क्षेत्रामध्ये रोजगाराच्या नवीन संधी निर्माण झालेल्या आहेत किंवा होत आहेत. या संधीचा फायदा घेण्यासाठी आवश्यक कौशल्ये योग्य वेळी मराठा जातीतील युवकांनी न दाखविल्यामुळे मुख्ये प्रवाहापासून हा समुह दूर फेकला गेला आहे.

मराठा समाजातील काही मूठभर व्यक्तींनी राजकीय लाग्याबांध्यातून ठेकेदारी किंवा शहरानजीक छोट्या-मोठ्या प्रमाणात घरबांधणी क्षेत्रामध्ये शिरकाव केलेला आहे. शेतजमिनीच्या किंमती प्रचंड वाढलेल्या आहेत, पंरतु त्या विकल्याशिवाय भांडवल उभे राहत नाही. अनेकांनी शेतजमिनी विकून घरे बांधली आणि महागड्या गाड्या विकत घेतल्या. शेतजमीन विकून आलेल्या पैशांची गुंतवणूक व्यवस्थित न केल्याने अनेकांचा भविष्यातील उत्पन्नाचा स्रोत बंद झालेला आहे. शेती करणेही फायदेशीर नाही आणि शेती करण्याशिवाय उपजिविकेचे दुसरे साधनही नाही, अशा द्वंद्वात शेतक-यांची युवा पिढी अडकलेली आहे. शेतजमिनींचे काय करायचे हा पेच या पिढीपुढे निर्माण झालेला आहे. या वर्गाला असे वाटते, की आरक्षण जर असते, तर आपल्याला शासकीय नोकरी मिळाली असती. आरक्षणामुळे शिक्षण शुल्कामध्ये सवलत मिळाली असती. त्यामुळे हा वर्ग आरक्षण मिळावे या मागणीसाठी मोठ्या संख्येने मोर्चामध्ये सहभागी होत आहे. ज्यांची पाल्ये शिकत आहेत अशा पालकांना वाटते, की आरक्षण मिळाले तर शिक्षणावर होणारा खर्च कमी होईल. शासकीय नोकरी मिळणे सोपे जाईल. शिक्षणावरील वाचलेला पैसा इतर अत्यावश्यक बाबींसाठी वापरता येईल. त्यामुळे बहुजन मराठा वर्गातील सर्वच घटक मराठा मूक मोर्चांमध्ये स्वेच्छेने सामील होत आहेत.

मराठा मोर्चा हे केवळ मराठा समाजापुढील अरिष्ठामुळे निर्माण झालेली घटना नाही तर राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर होत असलेल्या आर्थिक आणि तांत्रिक बदलांचा तो एक अविष्कार आहे. देशाच्या अर्थव्यवस्थेतील सर्वाधिक रोजगार देणा-या शेतकी क्षेत्राचा वाटा घटलेला आहे. भारताची अर्थव्यवस्था वाढत आहे. आर्थिक उदारीकरणाने भारतीय अर्थव्यवस्थेचा हिंदू विकास दर मागे टाकून तिला जगातील वेगाने वाढणा-या अर्थव्यवस्थांपैकी एक बनविली आहे. अर्थव्यवस्था वाढत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. परंतु रोजगाराच्या संधी मात्र निर्माण होताना दिसत नाही. रोजगारविहीन वाढीतून देशाची अर्थव्यवस्था जात आहे. नवउदारमतवादी अर्थव्यवस्थेत तांत्रिक नवनिर्मिती वेगाने होत आहे. उत्पादन कमाल पातळीवर होत आहे. परंतु ज्यावेगाने तंत्रज्ञान विकसित होत आहे त्या वेगाने लागणारी कौशल्ये असणारे कामगार निर्माण होत नाहीत. त्यामुळे सुबत्ता वाढूनही कामगारांचे किमान वेतन घटलेले दिसते तर अनेक रोजगार नवीन तंत्रज्ञानाच्या विकासामुळे नष्ट झालेले आहेत किंवा होणार आहेत (रूक्षकॉफ; २०१६:५३). जागतिक पातळीवर तसेच भारतात देखील आर्थिक विषमता वाढत आहे. जगातील १००० सर्वाधिक श्रीमंतांची संपत्ती एकूण जागतिक संपत्तीच्या २० टक्के आहे (पिकेटी; २०१४:४३८). क्रेडिट सुस ग्लोबल वेल्थ डाटाबुकनुसार (२०१४) भारतातील पहिल्या एक टक्का श्रीमंत व्यक्तींची संपत्ती देशाच्या एकूण संपत्तीपैकी ६१ टक्के आहे. उत्पन्न वाढत आहे परंतु आर्थिक विषमता आणि बेरोजगारी वेगाने वाढलेली आहे. त्यामुळे जागतिक व्यवस्थांपुढे मोठा पेचप्रसंग उभा राहिलेला आहे. अर्थव्यवस्थेसमोरील वरील पेच भारतात आणि विशेषतः महाराष्ट्रातही दिसून येतो. या अर्थिक पेचामुळे मोठ्या प्रमाणात लोक रस्त्यावर येऊन निषेध करत आहेत. भलेही निषेधाचे निमित्त वेगवेगळे असो.

भारतात सध्या डेमोग्राफिक डिविडंड (Demographic Dividend) बाबत बोलले जात आहे. देशाची ६५ टक्के जनता ही ३५ वर्षापेक्षा कमी वयोगटाची आहे (जनगनणना २०११). तरुणांचे लोकसंख्येतील प्रमाण अधिक असणे हे कोणत्याही देशासाठी फायद्याचे असते. सद्यकालीन आर्थिक प्रारूपामध्ये अर्थव्यवस्था वेगाने वाढत आहेत परंतु त्याप्रमाणात रोजगारनिर्मिती होत नाही. त्यामुळे काम करण्याच्या वयोगटातील तरुणांना देण्यासाठी कामच नाही, अशी अवस्था देशभरात निर्माण झालेली आहे. त्यातच तांत्रिक बदलांमुळे उत्पादनासाठी मनुष्यबळाची गरज कमी होत आहे आणि ई-कॉमर्स वगैरेंनी तर स्थानिक पातळीवरील रोजगारांवर मोठ्या प्रमाणात गदा आणली आहे. त्यामुळे बेरोजगारीचा भयावह प्रश्न निर्माण झालेला आहे. अशा स्थितीत भारतासाठी डेमोग्राफिक डिविडंड हा घटक बेरोजगारीच्या समस्येमुळे त्रासदायक ठरण्याचीच दाट शक्यता आहे. मराठा क्रांती मोर्चामध्ये सामील होणा-या बहुसंख्या युवकांच्या संख्येवरून युवकांपुढील गंभीर आर्थिक आव्हानांची कल्पना येते.

महाराष्ट्रातील मराठा मूक मोर्चातील आंदोलन हे जरी कोपर्डी येथील घटनेच्या निषेधार्थ असले, तरी या प्रकारची विराट आंदोलने मागील वर्षांमध्ये उत्तर भारतात जाट आणि गुजरातमध्ये पटेल समूहांनी केली होती. या आंदोलनांची देखील एक मराठा आंदोलनासारखी एक समान मागणी होती ती म्हणजे आरक्षणाची. या दोन्हीही जाती त्या राज्यातील वर्चस्वशाली जाती आणि शेतजमिनीची मालकी असलेल्या जाती आहेत. या जातींनी केलेले आणि महाराष्ट्रात सुरू असलेली मराठा जातीचे विराट मूक मोर्चे हे दोन्हीही कृषिक्षेत्रातील अरिष्टामुळे निर्माण झालेली आंदोलने आहेत. कॉंग्रेस वर्चस्वाच्या काळात राज्यांमध्ये वर्चस्वशाली जाती सत्तेत होत्या. त्यामुळे आर्थिक क्षेत्रातील पेचप्रसंगावर राजकीय सत्ताधारी आहोत या भावनेने डोके वर काढू दिले नव्हते. २०१४ च्या निवडणुकीत महाराष्ट्रातील मराठा वर्चस्वाला धक्का बसला (पळशीकर; २०१४:१२). त्यामुळे राज्यात राजकीय सत्ताही नाही आणि आर्थिकदृष्ट्या मराठा जातीचे हितसंबंधही धोक्यात आलेले आहेत, अशी भावना राज्यातील मराठा समाजामध्ये निर्माण झालेली आहे. त्या असंतोषातून जिल्हावार मोर्चे काढून शक्तिप्रदर्शन केले जात आहे. मराठा आंदोलन हे केवळ कोपर्डी किंवा आरक्षणासाठीचे आंदोलन नसून या आंदोलनातून संपूर्ण समाजापुढील आणि विशेषतः मराठा समाजापुढील आर्थिक पेचप्रसंग दिसून येतो. राज्याने नवे आर्थिक प्रारूप स्वीकारल्याने शासकीय नोक-या घटल्या आहेत. त्यामुळे आरक्षणाचा प्रत्यक्षात कितपत फायदा होणार याबाबत साशंकता आहे. सध्यातरी आर्थिक पेचावर उपाय म्हणून आरक्षणावर मागणी थांबलेली आहे. परंतु जसजशी आर्थिक कोंडी वाढत जाईल तसतशी आंदोलनाची तीव्रता वाढेल.

मराठा समाजांतर्गत अनेक अनिष्ट प्रथा, परंपरा सुरू झालेल्या आहेत. विवाहांवर केला जाणारा खर्च हा तर एक भयंकर प्रकार या समाजात सुरू झालेला आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विवाहाच्या खर्चातून एक दुष्टचक्र तयार होते ज्यातून दारिद्र्य, शिक्षण व आरोग्यावर खर्च न करण्याची परिस्थिती निर्माण होते. मुली होऊ न देण्याकडे कल निर्माण होतो. वरील आर्थिक कारणांखेरीज, ग्रामीण भागात राहणा-या मराठा जातीतील उपवर मुलास लग्नासाठी मुली मिळणदेखील अवघड झालेले आहे. आरक्षण असते तर नोकरी मिळाली असती अशी भावना ग्रामीण भागातील तरुणांमध्ये निर्माण झालेली आहे. मराठा जातीपुढील गंभीर आर्थिक पेच सोडविण्यासाठी आरक्षणासारखी सोपे उत्तर दिली जात आहेत. परंतु एकंदरीत नवउदारमतवादी अर्थकारणामुळे निर्माण झालेल्या आर्थिक अरिष्टाबाबत बोलले जात नाही.

या मराठा मूक मोर्चामध्ये लाखोंच्या संख्येने मराठा जातीचे नागरिक सामील झाले. या आंदोलनामुळे मराठेतर आणि विशेषतः दलित जातींमध्ये ॲट्रोसिटीच्या कायद्यात सुधारणा करण्याच्या मागणीने भीतीची भावना निर्माण झालेली आहे. तर आरक्षणाच्या मागणीने ओबीसी समूहांमध्ये राजकीय चलबिचल सुरू झालेली आहे. मराठेतर जातींची त्यातून गोळाबेरीज होऊन मराठा विरुद्ध मराठेतर असा संघर्ष महाराष्ट्राच्या राजकीय पटलावर पहावयास मिळू लागला आहे. मराठा क्रांती मोर्चाला प्रत्युत्तर म्हणून बहुजन क्रांती मोर्चाच्या माध्यमातून मराठेतर जातींना संघटित करून मोर्चे काढले जात आहेत. २४ ऑक्टोबरला अहमदनगर येथे बहुजन क्रांती मोर्चा काढण्यात आला. या मोर्चालाही प्रचंड प्रतिसाद लाभला. या मोर्चामधून मराठाविरोधाचे संकेत मिळत आहेत. (लोकसत्ता, अहमदनगर, दि. २५ ऑक्टोबर २०१६).

रोजगार आणि आर्थिक प्रश्नांनी मराठेतर जातींना देखील भेडसावलेले आहे. तूर्तास मराठाविरोधातून आर्थिक प्रश्नांकडे डोळेझाक होऊ शकते. आरक्षण असूनही या जातींतील युवकांना रोजगार मिळत नाहीत. रोजगाराची क्षेत्रे दिवसेंदिवस संकुचित होत आहेत. त्यामुळे आर्थिक पेचप्रसंग उभा राहिलेला आहे. या सर्व समूहांमध्ये वर्गीय आत्मभान निर्माण न होता जातीय अभिनिवेषामुळे आर्थिक प्रश्नाकडे दुर्लक्ष होत आहे. समाजात तेढ निर्माण होऊन एकमेकांच्या दुर्गतीला दुस-या जातीस जबाबदार धरले जात आहे. संरचनात्मक बदलाची मागणी होत नाही. जात हा घटक समान आर्थिक परिस्थिती असलेल्या समूहांना एकत्रित येण्यापासून रोखण्यात यशस्वी होत आहे.

**संदर्भः-**


१. केतकर कुमार, द सायलेंस दॅटस् डेफनिंग, द हिंदू, मुंबई, सप्टेंबर ३०, २०१६.

२. घोष जयती, रिपींग डिस्ट्रेस, *फ्रंटलाईन*, व्हॉल्यूम ३३, नं. १५, २३ जुलै, २०१६.

३. जनगणना २०११.

४. टाईम्स ऑफ इंडिया, पुणे, ऑक्टोबर २९, २०१६.

५. तेलतुंबडे आनंद, बिहाईंड द आयर ऑफ द मराठा, *इकॉनॉमिक ॲण्ड पॉलिटिकल विकली,* व्हॉल्यूम/ LI नं. ४०, १ ऑक्टोबर २०१६.

६. पवार प्रकाश, २००९, महाराष्ट्राच्या नव्या राजकारणाची पुनर्रचना (मतदारसंघ पुनर्रचना), पुणे, प्रतिमा प्रकाशन.

७. पवार प्रकाश, २०१६, काँग्रेसपुढील आव्हाने आणि भाजपचा उदय, पुणे, डायमंड प्रकाशन.

८. पवार प्रकाश, २०१६, मराठा क्रांती मोर्चा : अस्तित्वाशोधाचा शांततामय लढा!, शब्ददीप २०१६, सकाळ दिवाळी अंक.

९. पळशीकर सुहास, २००३, जात व महाराष्ट्रातील सत्ताकारण, पुणे, सुगावा प्रकाशन.

१०. पळशीकर सुहास, २००७, काँग्रेस वर्चस्वाची जडणघडण आणि पडझड, सुहास पळशीकर (संपा.) *महाराष्ट्राचे राजकारण : स्थानिक प्रक्रियेचे संदर्भ,* पुणे, प्रतिमा प्रकाशन.

११. पळशीकर सुहास, महाराष्ट्र असेंब्ली इलेक्शन : फेअरवेल टु मराठा पॉलिटिक्स?, *इकॉनॉमिक ॲण्ड पॉलिटिकल विकली,* व्हॉल्यूम XLIX नं. ४३ ॲण्ड ४४, १ नोव्हेंबर २०१४.

१२. महाराष्ट्राचे आर्थिक सर्वेक्षण २०१३-२०१४.

१३. मराठे संदीप, २०११, मतदारसंघ पुनर्रचनाः ठाणे जिल्हा एक अभ्यास, पुणे विद्यापीठ येथे एम. फिल. या पदवीसाठी जमा केलेला अप्रकाशित प्रबंध.

१४. पिकेटी थॉमस, २०१४, कॅपिटल इन द ट्वेंटी


अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फर्स्ट सेंच्युरी, लंडन, द बेल्नाप प्रेस ऑफ हर्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.
१५. रुक्षकॉफ डग्लास, २०१६, थ्रोइंग रॉक्स् अॅट द गुगल बस : हाऊ ग्रोथ बिकेम द अॅनिमी ऑफ प्रास्पेरिटी, यू. के., पोर्टफोलिओ पेंग्विन.
१६. लोकसत्ता, अहमदनगर, दि. २५ ऑक्टोबर २०१६.
१७. हिंदुस्तान टाईम्स्, २२ ऑक्टोबर २०१४.



दुसरी संवर्धित आवृत्ती

हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन

मे. पुं. रेगे

भारतातील नवसमाज उभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा. शि. स. अंतरकर आणि प्रा. स. ह. देशपांडे यांचे परीक्षण-लेख, मा. मे. पुं. रेगे यांनी अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा. स. ह. देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला ऊहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्यःस्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

पृष्ठे : २१५ किंमत रु. २००/-

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ,
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.



मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ११

श्री. के. वनपाल

पंढरपुरला प्रोबेशन पिरियडची सुरुवात झाली. (प्रोबेशनला 'परिबीक्षाधीन' हा मराठी शब्द आहे. त्याची मला भीती वाटे) त्यानंतर अक्कलकोटला म्हणजे पंढरपुर-सारख्या पवित्र स्थानाच्या जवळच्या अक्कलकोटला माझी नोकरीची सुरुवात झाली. त्याचा आनंद मला आणि माझ्या आईलाही खूप झाला. मागे एक-दोनदा मी अक्कलकोटच्या संबंधात लिहिले आहे. हृदयाला भिडणारे आणखी एक-दोन प्रसंग घडून गेले, त्याविषयी लिहिले पाहिजे.

(१)

नवीन नवीन तहसिलदार, तेही तरुण म्हणून ब-याच नागरिकांना मला भेटावेसे वाटले. व्यापा-यांनाही माझी भेटी घेण्याची इच्छा असे. मला वाटे काही काम असेल म्हणून येत असतील. पण 'काही काम नव्हतं; पण म्हटलं भेटून जावं', असे ते म्हणत मलाही त्यामुळे फार बरं वाटलं. कुठं माझी पूर्वीची सचिवालयातली ज्युनिअर ॲस्टिटंटची नोकरी आणि कुठे ही सामान्य जनतेला आदराचे स्थान झालेली मामलेदारी, असे माझ्या मनात येत असे त्यामुळे प्रसन्न वाटे.

नुकतीच ज्वारी काढणीची वेळ झाली आणि तिची लेव्ही गोळा करायची असते हे समजले. सोलापूरच्या जिल्ह्याधिका-यांच्या कचेरीत तहसिलदारांची सभा झाली. प्रत्येकाला ज्वारी खरेदीचे लक्ष्य ठरवून देण्यात आले. परत आल्यावर मी सर्कल ऑफिसर्स, तलाठी, अव्वल कारकून यांची सभा घेतली. लक्ष्य साध्य करता येईल का यांची सांगोपांग चर्चा झाली. विभागवार लक्ष्येही ठरविण्यात आली.

पारकर नावाचा अव्वल कारकून मोठ्या धारिष्ठ्याचा होता. तो म्हणाला, "रावसाहेब हे ज्वारी खरेदीचं काम फार गुळमूळीत असतं. तलाठी ते मनावर घेत नाहीत. म्हणून माझा विचार आहे की, त्याला समारंभाचं स्वरूप देऊ या. म्हणजे असं की, आपण एक दिवस ठरवू. त्या दिवशी निदान माझ्यातरी भागात मी प्रत्येक गावातून त्या गावाच्या लक्ष्याप्रमाणे त्या दिवशी गोळा झालेली ज्वारी बैलगाड्यांची मिरवणूक काढून गोडाऊनमध्ये जमा करून घेतो. ४२ गावं आहेत. मला अगोदर आठ दिवस नियोजनासाठी द्या. उद्याच कामाला लागतो."

सभेचा एकदम नूरच पालटला. इतरही प्रमुख सर्कल ऑफिसर्सनी ही कल्पना उचलून धरली. गावात येणा-या दोन्ही-तिन्ही वाटांनी ज्वारी आणून हे काम एकाच दिवशी संपवायचे असा निर्णय झाला. मधून-मधून प्रत्येक गावात किती ज्वारी गोळा झाली, बैलगाड्या किती येणार याची माहिती मला अधिकारी देत असत. १५ दिवसांनी पूर्ण तयारी झाल्यावर एक दिवस ठरवला. पारकरांनी प्रमुख वेशीतून आणायचे ठरवले. अगदी पहिल्या गाडीतल्या पोत्यांवर एक आसन तयार करण्यात आले. त्यावर मी फेटा घालून बसायचे आणि २५ गाड्यांची मिरवणूक गावात आणायची असा बेत झाला.

ठरल्या दिवशी मोठ्या आनंदाने मी त्या पहिल्या गाडीत चढलो. त्या गाडीसाठी पारकरांनी पांढ-या शुभ्र बैलांची देखणी जोडी निवडली होती. सगळी गाडी सजवली होती. गाडी गावात शिरताना तुरुंगाच्या इमारतीवरून जायची होती. उपासनी नावाचे जेलर होते. गाडी आल्यावर त्यांनी माझं स्वागत केलं आणि हस्तांदोलन केलं. त्यांचा मूलगा जवळच होता. पटकन म्हणाला, "दादा, रावसाहेबाचं लग्न झालंय् का? त्यांची वरात आहे का?" सगळीकडे हशा झाला.

दोन-तीन दिवस एका पाठोपाठ एक गाड्या येत होत्या. आम्ही ज्वारी लेव्हीचे लक्ष्य पूर्त करून टाकलं. जिल्हापुरवठा अधिकारी आणि जिल्हाधिकारी यांना तसं कळवलं. नंतर एक हृदय हेलावणारा प्रसंग घडला.

दोन-तीन दिवसांनी नव्या राजवाड्यातून फोन आला. "राणी साहेब बोलायचं म्हणतात. मोकळे असलात तर जोडून देऊ का?"

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"अवश्य द्या जोडुन; की मीच येऊन भेटू?" – मी

"नाही आपण नका येऊ मी जोडून देतो." "रावसाहेब नमस्कार, अगदी थोडक्यात सांगते. आमची ३५० एकर जमीन आहे व त्यावर ९० पोती ज्वारी लेव्ही म्हणून द्यायची आहे. तुमचा कार्यक्रम संपलाय पण आमच्यावर आलेल्या नोटीसीचं काय करायचं? आपण म्हणाल तसं करू आमच्याकडे तर ज्वारी नाही." – राणीसाहेब.

एखाद्या खातेदारानं ज्वारी लावली नसली, तरी त्याच्या बागायती क्षेत्राचा विचार करून लेव्ही आकारली जात असे.

"राणीसाहेब आपण काही काळजी करू नका. ती नोटीस विसरून जा. दुस-या कोणाची तरी सरप्लस ज्वारी घेऊन आपल्या नावे जमा करतो. इतकी काळजी करण्यासारखी गोष्ट नाही."

"खूप बरं वाटलं हो तुमच्याशी बोलून. आपल्या सवडीनं राजवाड्यावर येत जा. पण आणखी एक सांगू का?......"

"सांगा, अवश्य सांगा, राणीसाहेब." "राजवाड्यावर येणं जाणं खूप असतं. चहा करायचा म्हटला तर साखर कमी पडते. काही होऊ शकेल का?" "तीही काळजी करू नका, राणीसाहेब. मी करतो व्यवस्था. आपली गादी खुद्द शिवाजी राजांच्या नातवांने निर्माण करून आपल्या पूर्वजास दिली आहे. आम्हाला ती गादी अक्कलकोट स्वामी महाराजांच्या किंवा छत्रपतींच्या गादी इतकीच पूज्य आहे. तेव्हा तूम्ही निश्चिंत रहा. उलट माझीच आपल्याला विनंती आहे की, आपल्या दप्तरखान्यात जुनी कागदपत्रे आणि पुस्तके असतील, तर ती मला पाहू द्यावीत."

"असं काय म्हणता, रावसाहेब? तुम्ही शासन चालवताय. राजवाड्यातल्या सगळ्या गोष्टी तुमच्याच आहेत." — राणीसाहेब .

"अस नका म्हणू, राणीसाहेब. मी आपल्या पी. ए. शी बोलून कागदपत्रे पहायला येऊन जाईन. आपण त्यांच्याशी बोलून ठेवा म्हणजे झालं."

"अगदी अवश्य सांगतो",– राणीसाहेब.

"माध्यमिक शाळेत असताना इतिहासाच्या तासाला मराठ्यांचा इतिहास शिकवला जायचा तेव्हा शिक्षकांनी सांगितले होते की, शाहू महाराज औरंगजेबाच्या छावणीतून सुटले. औरंगजेबाच्या कबरीला प्रणाम करून येत असताना मोगल अंमलदार लोखंडे याच्याशी त्यांची छोटी चकमक उडाली आणि लोखंडे मारला गेला. त्याच्या बायकोने आपल्या मुलास शाहू राजांसमोर उभे केले. त्यावेळेस महाराजांना गहिवरून आले आणि त्या मुलास आपला मानसपुत्र म्हणून जवळ ठेवले. पुढे त्यास अक्कलकोटची जहागिरी दिली आणि त्याचे नाव फत्तेसिंग असे पडले. असा तो इतिहास."

शाहू राजांपासून चालत आलेल्या अक्कलकोट संस्थानातल्या रयतेशी आपला संबंध येणार आणि त्यांची सेवा करायला मिळणार या भावनेने माझे मन आधीच भरून आले होते. त्यातच राणीसाहेबांशी हा संवाद झाला. त्या रात्री मी बराच वेळ हाच विचार करीत राहिलो.

(२)

रब्बी ज्वारीची सुगी संपली की, खरीपाच्या आणि रब्बीच्या उत्पन्नाचे पैसे शेतक-याकडे असतात आणि त्यामुळे महसूलाची वसूली करण्याची लगबग सुरू होते. ६६-६७ च्या काळात महसूलात बरीच तुट आली होती. त्यामुळे यंदा शासनाच्या वसूलीवर जास्त जोर होता. जिल्हाधिका-यांकडे बैठक झाली आणि महसूलाची व तगाईची वसूली जोरात करण्याचे ठरले.

पुनः तेच. पुनः सर्कल ऑफीसर्स, अव्वल कारकून यांना गावे वाटून देण्यात आली. एका सभेत तलाठ्यांनी असे सांगितले की, काही कुळे अगदी खट असतात. ग्रामपंचायतीचे सदस्य आणि जिल्हापरिषदेचे सदस्य पैसे द्यायची टाळाटाळ करतात. निरनिराळे दबाव आणतात. मग मीच अशा गावांची आणि तालेवार व्यक्तिची यादी करून घेतली आणि स्वतःच त्यांच्याकडून कर वसूल करून घेण्याचे ठरवले. काही तलाठी हुशार असत. ते मला सांगत की, "आडवळणी गावात जाल तेव्हा तलाठ्याबरोबर सैदप्पा शिपायालाही नेत जा. सैदाप्पाचा काळा कोट आणि त्यावरचा पितळेवरचा बिल्ला बघितला की, खातेदार निम्मा गारच होतो. शिवाय जास्त रक्कम जमा झाली, तर बल्लू पैलवानालाही तुमच्याबरोबर न्या. न जाणो, एखाद्याने हल्ला केला तर बल्लू पैलवान



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपयोगास येईल. सैदप्पाच्या करवी बल्लूला निरोप द्या. आम्ही बल्लूला सांगून ठेवलं आहे."

अशा काही खट आणि मोठ्या गावी जाऊन मीही ५०,०००/- रुपयापर्यंत वसूली करून आणीत असे. पण एके दिवशी रघुनाथ कुलकर्णी नावाचा तलाठी घरी आला.

"काय रघुनाथ, वसूली कशी चाललीय? टारगेट ॲचीव करणार का?" – मी.

"अगदी निश्चित. पण एक विनंती होती. एका सकाळी लवकरच्या एस. टी. नं तुम्ही जेऊरला आलं पाहिजे. तिथं आल्यावर सगळं सांगतो. मात्र वर्कींग डेला या."

"ठीक आहे. येत्या सोमवारी किंवा मंगळवारी सकाळी ७ च्या एस. टी. नं येतो" – मी.

"या. मी असतोच सकाळी ८ पासून चावडीत. बाकीचं सांगतो मी तिथं आल्यावर." – रघुनाथ

ठरल्याप्रमाणे मी मंगळवारी जेवूरला गेलो. रघुनाथ वाटच पाहात होता. उतरल्याबरोबर तो मला चावडीकडे घेऊन गेला. त्याने कोतवालाला एस. टी. स्टँडवर हजर ठेवलं होतं. मात्र त्याला आमच्याबरोबर चावडीकडे यायला सांगितलं नाही. मी त्याला विचारलं, पण रघुनाथ म्हणाला 'नंतर सांगीन.'

"रावसाहेब, आता साडेनऊ-दहाच्या सुमारास पंचायत समितीचे सभापती काशीरामा पाटील स्टँडवर येतील. ते दररोज या गाडीनं अक्कलकोटला जातात. तगाईची सर्वात जास्त थकबाकी त्यांच्याकडे आहे, मी कोतवालाला सांगितलंय की, काशीरामा आले की, त्यांना सांगा, 'रावसाहेब आलेत; तलाठी भाऊसाहेबांनी चावडीवर बोलावले. येतील ते" – रघुनाथ.

मला इंगित कळलं. काशीरामांना पुढं घालून चावडीत आणलं "रावसाहेब, इतक्या सकाळी आलात? मोठं अजब आहे! कुठलाही अधिकारी इतक्या लवकर कुठल्या गावी आलेला मी तरी पाहिला नाही." – काशीरामा.

"बरोबर आहे तुमचं, पण महसूल खात्याला सध्या जास्त काम करण्याची गरज आहे. जशी लेव्ही तशी तगाई – दोन्हीची वसूली आणि तीही या एक-दोन महिन्यात करणं गरजेच आहे. शासनाची तशी फर्मानं निक्त आहेत. म्हणून आम्हाला पळापळी करावी लागतेय, दुसरं काय? सकाळ नाही, संध्याकाळ नाही, सारखे आम्ही या विवंचनेत! या रघुनाथामूळे इथल्या वसूलीची काळजी नाही. पण मोठं गाव आहे. मोठ्या गावातली वसूली कशी होतेय हे पाहिलं पाहिजे, म्हणून आलो, दुसरं काय?"

काशीरामांचा चेहरा हळूहळू बदलू लागला होता. हा ओळख देखीचा, संबंध वाढवण्याचा किंवा जोपासण्याचा विषय नसून रघुनाथ तलाठ्यानं हा घडवून आणलेला प्रसंग आहे हे काशीरामाने ओळखले. त्यांनी तलाठ्याकडे पाहिलं त्या पाहण्यात 'काय करू?' असे भाव होते. म्हणजे गावाची वसूली काशीरामांकडून न होणा-या वसूलीमूळे मागे पडलीय, हे माझ्या लक्षात आलं. मी म्हटलं, "रघुनाथ काशीरामांच्याकडून काही येणं आहे काय? आण इकडे ते पावती पुस्तक. त्यांच्याकडच्या येणं रकमेची पावती दस्तूर खुद्द मी फाडतो!"

रघुनाथाला प्रश्न पडला. हे रावसाहेबांचं खूळ! तलाठ्यांच्या पावतीपुस्तकावर रावसाहेबांची सही? तो चूळबूळ करू लागला. पण कुठला ऐकायला! "आण ते पुस्तक", असं म्हणून मी पावतीपुस्तक ओढूनच घेतलं.

"रावसाहेब यांच्याकडनं २७००/- रुपयांच येणं आहे. त्यांना विचारू या तरी किती भरतात ते" – रघुनाथ

"अहो भाऊसाहेब", मी म्हणालो, "अहो किती हा अविश्वास? पंचायत समितीचे सभापती आहेत काशीराम! ते काय आपल्याला हात हलवत जाऊ देतील? मी देतो त्यांना पैसे मिळाल्याची पावती. पैसे ट्रेझरीत भरायला दोन दिवसाची मुदत असते आपल्या खात्याला. आज संध्याकाळी किंवा उद्या सकाळी ते हे सगळे पैसे देतील. काळजी करू नका. माझा विश्वास आहे त्यांच्यावर अहो, माझ्या आखत्यारीत त्यांच इलेक्शन झालं ते मला असे कसे जाऊ देतील?"

असे म्हणून मी पावतीबुकावर सगळ्या रकमेची पावती केली, त्यावर सही करून पावती फाडली. एखादा पुष्पगुच्छ द्यावा त्याप्रमाणे नाटकी हावभाव करून ती पावती काशीरामांच्या हाती दिली.

तलाठी भाऊसाहेबांना, म्हणजे रघुनाथाला, हा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सगळा प्रकार पाहून घाम फुटायचाच बाकी राहिला होता. एक म्हणजे रक्कम मोठी; आणि पैसे हातात आल्याशिवाय अशी पावती देणं हे जन्मात त्यानं कधी केलं नव्हतं.

काशीरामा उठले. अर्ध्या तासात परत येतो म्हणाले. अर्ध्या तासाने ते सगळी रक्कम घेऊन चावडीत आले, मोठ्या प्रेमाने त्यांनी माझ्या हातात पैसे ठेवले. म्हणाले, "रावसाहेब केवढं मोठं मन तुमचं! सरकारी माणसं एवढा विश्वास दाखवतील तर शेतकरी त्यांना कधी अंतर देणार नाही. तुमचं वय लहान; पण विचार करण्याची पद्धत पाहून मी थक्क झालो. व्यापा-याकडून एक आणा व्याजानं पैसे उचलून आणलेत, पण त्यातसुद्धा मला आनंद आहे. असेच कर्तव्यनिष्ठ रहा. दुसरं काय म्हणणार?"

काशीरामांच्या डोळ्यात पाणी तरळल्याच दिसलं. मलाही त्या वयस्कर पण सुसंस्कृत शेतक-याचं वर्तन पाहून गहिवरून आलं. चहा-पान करून हस्तांदोलन करून काशीरामा निघून गेले.

रघुनाथ तलाठ्यानं या गोष्टीचा सगळीकडे बोभाटा केला आणि पुढच्या पंधरा दिवसात त्याच्याकडच्या दोन गावांची सगळी वसुली पूर्ण केली!

(३)

लेव्ही झाली. वसूलीचा लांबलेला दंगाही संपला. तलाठ्यांना, सर्कल ऑफीसर्सना थोडी उसंत मिळू लागली. मला हायसं वाटलं. पैसे वसूलीत तर इतर तालूक्यातल्या वसूलीपेक्षा आमच्या तालुक्यातली वसूली खूपच उठून दिसली. कलेक्टर साहेबांनी माझं भर सभेत कौतुक केलं. पण महसूल खात्यात कधी कोणत्या कामाला सामोरे जावे लागेल याचा नेम नाही. शासनाचा कलेक्टर या इन्स्टिट्यूशनवर जबरदस्त विश्वास! वास्तविक अँडरसन या अधिका-यानं एका हाती लँड रेव्हेन्यू कोड, रूल्स आणि त्या खालोखाल तलाठ्यांच्या प्रत्येक खेड्याच्या तलाठी दप्तराची १ ते १८ फॉर्मस्‌मध्ये इतकी सुंदर आणि सुटसुटीत व्यवस्था लावून दिली आहे की, त्याच्या या कार्याला तोडच नाही. पण याशिवाय महसूल अधिका-यांना निवडणूक, जनगणना, लेव्ही, स्मॉल सेव्हिंगस्, फॅमिली प्लॅनिंग असल्या १७ प्रकारच्या कामाचं ओझं उचलावं लागतं.

पावसाळा आला. अक्कलकोट तालुक्याच्या पश्चिम भागातून सीना नदी वाहते तिला अतिवृष्टीमूळे इतका पूर आला की, आम्हा सगळ्या अधिका-यांची झोपच उडाली. काही गावांना पाण्याचा वेढा पडला. मीच काय आमचे प्रांत ऑफिसर यांनाही फार काळजी वाटू लागली. कलेक्टरांना आपण 'आँखो देखा हाल' सांगावा म्हणून ते अक्कलकोटला आले. मी तडवळची एस. टी. पकडून तिकडच्या गावांना जायच्या तयारीत होतो. इतक्यात त्यांची जीप आली म्हणून मला ते आणखीच सोपे झाले.

आम्ही अक्कलकोट सोडले. तडवळला पोचलो. थोडं चहा-पाणी झाल्यावर कोणतं खेडं जास्त अडचणीत येणार आहे त्याचा अंदाज घेऊन तिकडे निघालो. नदीकाठच्या अडचणीत सापडणा-या त्या गावात शिरताना हळूहळू गढूळ पाणी वाढत असल्याचं दिसलं. आमची जीप आम्ही अलीकडच्या काठावर ठेवली आणि पायीच नदी ओलांडली. जीप पात्रात रूतली असती, तर ती काढण्यातच सगळा वेळ गेला असता.

पाटलांनी आमचं स्वागत केलं छोटीशी चावडी होती. ग्रामपंचायतीची पाटी तिथे लटकत होती. चहा-पाणी झालं, अशा खेड्यात जाताना तलाठी आपल्याबरोबर एक ठरीव नाष्टा बाळगत असतो, तो म्हणजे ग्लुकोज बिस्टिकाचे दोन-तीन पुडे, डझनभर केळी आणि एखादे चिवड्याचं पाकीट. एकदा मी एका तलाठ्याला ही अशी सोय सगळीकडे का असते, दुसरं काही आढळंत नाही का? असं विचारलं होतं. तेव्हा तलाठ्यानं छान उत्तर दिलं. "काय होतं, आपण खेड्यात केव्हाही येतो त्यावेळी सरपंच, कोतवाल, पाटील असं तिथं कुणीतरी असतील असं नाही, तेव्हा ते येई तोवर हा नाष्टा खाऊन भूक भागवतो. अधिका-यांची पोटाची काळजी घेणं आमचं कामच आहे आणि या गोष्टी कुठेही मिळतातच."

मला वाटतं अजूनही हाच प्रघात चालू असेल! पोचलो तेव्हा संध्याकाळ झाली होती, प्रांत साहेबांच्या डायरीला नोंद असावी म्हणून तलाठ्याचं दप्तर तपासलं. प्रांत साहेब नवीन आणि मीही नवीन. काही गोष्टी तलाठ्याला विचारूनच आम्ही सह्या केल्या. तोवर समोरच्या शाळेतल्या एका खोलीत पाटलांनी जेवणाची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सोय केली. जेवण अगदी सुग्रास होतं. आम्ही सगळे खूष झालो.

'बाहेर नदीला पाणी वाढलं नसलं तर परत फिरूया' असं प्रांत म्हणाले. कोतवाल पाणी वाढतं का ते बघून आला. तो म्हणाला, "रावसाहेब पूरचं आलाय तेव्हा आता मुक्काम करायला लागेल!" आली का पंचाईत. पाटलांनी 'घरी दोन खाटा घालून व्यवस्था करतो', असं मला बाजूला घेऊन सांगितलं. असं कुणाच्या घरी मुक्काम करणं हे अधिका-यानं करू नये असा प्रघात होता. – शाळा किंवा चावडी ही ठिकाणं ठीक. मी प्रांत साहेबांना विचारलं, "कसं करूया?" ते म्हणाले, "त्याच खाटा इथं चावडीतून आणून घ्या. पाटलांच्या घरी नको." पाटलांना मी तसं सांगायला आणि पाटलांचा चेहरा एकदम बदलायला एकच गाठ!"

"पाटील, एकदम असे घाबरल्यासारखे का दिसताय?"

"काय सांगू रावसाहेब, चार वर्षांपूर्वी इथं इथल्या एका कोतवालानं गळफास लावून आत्महत्त्या केलीय, त्याचं भूत असतं इथं. रात्री आवाज करतय. लै भयाण वाटतं! तुम्ही इथं अजिबात झोपलं नाही पाहिजे."

मला थोडं कसंतरीच वाटलं. बघूया प्रांतसाहेब काय म्हणतायत ते, असा विचार करून मी हे सगळं प्रांत साहेबांना सांगितलं ते खळखळून हसले आणि म्हणाले, "अहो रावसाहेब, तुमच्या आमच्यासारखी शासकीय भूतं इथं झोपली, तर ते भूत आपल्याला काही करेल का? उलट ते कायमचं पळून जाईल. सांगा त्या पाटलांना इथंच खाटा आणायला."

मोठ्या मिनतवारीने पाटलांची समजूत घातली आणि खाटा आणून घेऊन आम्ही तिथे अगदी निवांत झोपलो. पाटीलही बाहेर रस्त्याच्या कडेला खाट टाकून झोपले. न जाणो, रात्री काही प्रसंग उद्‌भवला तर आपण असलेलं बरं. जबाबदारी आपली आहे, असा त्यांनी विचार केला असणार.

कुठलं भूत अन् कुठलं काय! रात्री काहीच घडलं नाही. सकाळी प्रातर्विधी आणि चहापाणी उरकून आम्ही बाहेर पडलो. पुराची स्थिती जाणून घेतली. 'आता पूर थोडा ओसरू लागलाय आणि थोड्या वेळात नदी ओलांडता येईल' असे सांगण्यात आले.

नदी काठावर आलो तर काही माणसं धोतर वर करून नदी ओलांडत होती. असं दिसलं पुढं जाऊन कोतवालानंही पाण्याचा थोडा अंदाज घेतला. प्रांत जरा गडबडले 'ही पँट कशी वर करायची? पलीकडं कसं जायचं?'

शेजारी बायका दगडावर धुणं धूत होत्या. आमची उलघाल चाललीयं ते पाहत होत्या. एकजण एकदम म्हणाली, "अवं काढा की पँटा, अन जावा की, अंडरपँटवर असं दबकता का?" हे तिच बोलणं प्रांतांना समजलं नाही. मी सगळं समजावून सांगितल. प्रांत हसले, अगदी खळखळून! त्यांनी पँट काढली आणि पाटलांच्या साहाय्याने हळूहळू नदी ओलांडली. मध्ये खोल पाणी लागल्यावर पाटलांनी त्यांना उचलून खांद्यावर घेतले आणि जलप्रवास पूर्ण केला. मीही कोतवाल आणि तलाठ्याच्या साहाय्यानं नदी ओलांडली. पलीकडच्या काठावर गेल्यावर प्रांतांनी घाईघाईने पँट घातली. आम्ही सगळेजण जीपमध्ये बसलो आणि सूसाट अक्कलकोटकडे निघालो. ❁❁❁



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अमेरिकेचे मृगजळ

माणिक खेर

स्वातंत्र्य व लोकशाही या मनुष्यामनुष्यातील संबंधांच्या तत्त्वांचा आदर्श म्हणून आपण अमेरिकेकडे पाहत आलो आहोत. परंतु अमेरिकेने व्यापाराच्या निमित्ताने व आर्थिक वर्चस्व निर्माण करण्याच्या दृष्टीने जगभर धुमाकूळ घालून या तत्त्वांची पायमल्ली केली आहे. Confessions of an Economic Hit Man नावाच्या पुस्तकातून आपल्या लक्षात ही गोष्ट येते. जॉन पर्किन्स यांनी हे पुस्तक लिहिले आहे. (याचा अनुवाद 'एका आर्थिक मारेक-याचा कबुली जबाब' या नावाने सी. पं. खेर यांनी केला आहे.)

अमेरिकेचे हे आर्थिक मारेकरी जिथे जिथे अमेरिकेला स्वतःचे वर्चस्व निर्माण करायचे आहे, अशा सर्व देशात पसरलेले असतात. उदा., सौदीअरेबिया, इराण वगैरे तेलाचे साठे असणारे देश यातून पसरलेले असतात. ते तेथील सत्ताधा-यांच्या गळी असा विचार उतरवतात की, 'त्यांनी मोठाली कर्जे घेऊन आपला आर्थिक विकास साधावा. अमेरिकेतील मोठाल्या कंपन्या तुमच्या देशात आपल्या खर्चाने रस्ते, वीज, धरणे, मोठाली बांधकामे अशा पायाभूत सुविधा निर्माण करायला उत्सुक आहेत.' अशा प्रकल्पातून जो पैसा निर्माण होईल, तो पुन्हा अमेरिकेकडे वळेल ह्याची काळजी हे मारेकरी घेतच असतात. जे देश अमेरिकन साहाय्य संस्थाकडून कर्ज घेतात ते सतत कर्जबाजारीच राहतील आणि त्यांचे दिवाळे निघेल याचीही काळजी ह्या मारेक-यांनी घ्यायची असते. कर्जबाजारी झालेले देश अमेरिकेतील किंवा आंतरराष्ट्रीय सावकारी संस्थांनचे मिंध्ये होतात. त्यामुळे अमेरिका त्यांच्यावर अनेक जाचक अटी लादू शकते. उदा., त्या देशात लष्करी तळ उभे करणे, त्या देशातील नैसर्गिक साधनसंपत्तीवर हक्क मिळवणे इ. जर एखाद्या देशातील राज्यकर्ता अमेरिकेच्या या शिरजोरीला बधला नाही, तर त्या राज्यकर्त्यांची हत्या करायला अमेरिकेचे हस्तक कमी करत नाहीत. पर्किन्सनी अशी उदाहरणे आपल्या पुस्तकात दिली आहेत.

ज्या अमेरिकन कंपन्यांना अशी आर्थिक विकासाची कामे मिळाली, त्या कंपन्यांच्या मालकांशी अमेरिकेतील राजकारण्यांचे घनिष्ठ आर्थिक संबंध असतात. याबाबतीत पर्किन्सनी बेक्टेल कंपनीचे उदाहरण दिले आहे. 'निक्सन यांच्या राजवटीत जॉर्ज शूल्ट्झ हे वित्तमंत्री होते. पुढे ते बेक्टेल कंपनीचे अध्यक्ष झाले नंतर रेगन अध्यक्ष असताना त्यांच्या सरकारात ते मंत्री बनले कॅस्परविनबर्गर हे बेक्टल कंपनीचे उपाध्यक्ष होते. ते रेगनच्या सरकारात संरक्षणमंत्री झाले. रिचर्ड हेल्म्स हे बेक्टल कंपनीत उपाध्यक्ष होते. प्रेसिडेन्टच्या जॉन्सनच्या काळात अमेरिकन गुप्तहेर संस्था सी. आय. ए. हीचे ते संचालक होते. जॉन्सन नंतर निक्सन हे अमेरिकेचे अध्यक्ष होते. त्यांच्या कारकिर्दीत हेल्म्स यांना इराणमध्ये अमेरिकेचे राजदूत म्हणून पाठवण्यात आले.'

हॅली बर्टन या कंपनीची हकीकत अशीच आहे. रिचर्ड चेने हे या कंपनीचे अध्यक्ष होते. जॉर्ज डब्ल्यू बुश या अमेरिकेच्या अध्यक्षांच्या कारकीर्दीत ते संरक्षणमंत्री झाले तर या पहिल्या बुशचा मुलगा जॉर्ज डब्ल्यू बुश (२) हा अध्यक्ष झाल्यावर ते उपराष्ट्राध्यक्ष झाले. खुद्द जॉर्ज बुश दुसरे हे झपाटा प्रेट्रॉलियम कॉर्पोरेशन या कंपनीचे संस्थापक होते.

या वरून दिसून येईल की, अमेरिकेतील मोठ्या कंपन्या आणि अमेरिकेतील सरकार यांचे केवळ निकटचे संबंध नव्हते, तर या कंपन्याच सरकार झाल्या होत्या. त्यामुळे इतर देशात विकास कामे निघाली की, त्यांची कंत्राटे या कंपन्यांना मिळणारच. इराकवर अमेरिकेने आक्रमण करून त्यांची धुळधाण केली. नंतर इराकची पुन्हा बांधणी करण्यासाठी अमेरिकेनेच इराकला कर्जे दिली. मात्र या बांधणीची कंत्राटे बेक्टल कंपनीला मिळाली.

अमेरिकेने तेलाचे साठे असलेल्या अनेक देशात उदा., सौदीअरेबिया, इंडोनेशिया, पनामा, व्हॅनिझूअेला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इत्यादी. असंख्य उचापती व उलथापालथी केल्या आहेत. सौदी राजघराणे व बुश हे कुटूंब यांचे २० वर्षांचे व्यापारी व राजकीय संबंध आहेत, असे 'व्हॅनिटी फेअर' या मासिकाने ऑक्टोबर २००३ म्हटले होते. ओसामा बिन लादेन या अतिरेक्याचे सौदी घराण्याशी जवळचे संबंध होते. त्यामुळे अमेरिका लादेनला पैसा पुरवत असे. सौदी अरेबियाला अमेरिकेने दहशतवाद्यांना पैसे पुरवण्याची मुभा दिली होती. अफगाणिस्तानातून सोव्हिअेट युनियनला हाकलून देण्यासाठी अमेरिकेने सौदीअरेबियाला साडेतीनशे कोटी डॉलर्स दिले होते. त्या पैशातून सौदीअरेबियाने दहशतवाद्यांच्या संघटना उभारल्या. आता आपण अमेरिकेने त्यावेळी पेरणी केलेल्या दहशतवादाची फळे चाखत आहोत.

इक्वेडोअर हा दक्षिण अमेरिकेतला लहानसा देश वर उल्लेखलेले पर्किन्स हे १९६८ साली पहिल्यांदा इक्वेडोअरमध्ये गेले. तेव्हापासून तो देश अमेरिकेतील बड्या भांडवलदारी कंपन्यांच्या कारस्थानांना बळी जाऊ लागला होता. "माझे सहव्यवसायी, मी आणि या भांडवली कंपन्यांचे व्यवस्थापक अशा सर्वांनी मिळून इक्वेडोअरला कंगाल बनविण्याची व्यवस्था केली होती. आम्ही त्या देशाला अब्जावधी डॉलर्स दिले. त्या कर्जातून त्या देशाने आमच्याच कंपन्यांना नाना प्रकारच्या विकास कामांची कंत्राटे दिली. त्यामुळे या कंपन्यांना अतोनात नफा मिळाला. परिणाम असा झाला की, त्यानंतरच्या ३० वर्षांत दरिद्री लोकांचे प्रमाण ५०% हून ७०% वर गेले. देशावरील कर्ज चोवीस कोटीवरून सोळाशे कोटी डॉलर्सवर येऊन पोचले आणि राष्ट्रीय साधनसंपत्तीतील गरिबांचा वाटा २०% वरून ६% पर्यंत घसरला. आता इक्वेडोअरची अशी स्थिती आहे की, त्याच्या अंदाजपत्रकातील निम्मा खर्च कर्ज फेडण्यासाठी होतो आणि गरीब लोकांची सुधारणा व्हावी यासाठी खर्चाला पैसे उरत नाहीत."

पर्किन्स यांना आपल्या दुष्कृत्यांचा पश्चात्ताप होऊ लागला व त्यांनी हा कबुली जबाब लिहून काढला. नंतर त्यांना वाटू लागले हे पुस्तक प्रसिद्ध केले, तर आपला खून होईल म्हणून ते पुस्तक तसेच पडून राहिले. सुमारे २० वर्षांनंतर आपल्या मुलींच्या आग्रहाखातर पुस्तक प्रसिद्ध करण्याचे ठरवले, पण पुस्तकाला प्रकाशकच मिळेना. एका प्रकाशकाने अशी सूचना केली की, ही सर्व हकीकत काल्पनिक आहे असे भासवावे, पण पर्किन्स यांनी ते मान्य केले नाही. सुदैवाने तसे काही झाले नाही. पर्किन्स जिवंत राहिले आता त्यांनी आदिवासी लोकांच्या कल्याणासाठी आणि पर्यावरणाच्या सांभाळासाठी स्वयंसेवी संघटना स्थापली आहे.

पर्किन्स यांच्यानंतर गेल्या २० वर्षांत आर्थिक मारेक-यांचा आता जगभर सुळसूळाट झाला आहे. अनेक मोठमोठ्या कंपन्यांचे हस्तक म्हणून ते काम करत असतात. मोठाले उद्योग आपल्या व्यवस्थापकांना जगभर पाठवतात तेथे ते स्वस्थ कामगार मिळवतात. 'आऊट सोर्सिंग' या नावाखाली हे व्यवस्थापक दुस-या देशांना आपल्या जाळ्यात अडकवतात. मात्र आणखी स्वस्त दरात दुस-या देशातील कामगार मिळू लागले, तर पहिल्या देशातील असलेले संबंध ते तोडून टाकतात. आज भारतात देखील परकीय – विशेषतः अमेरिकन - कंपन्यांच्या भागीदारीत उद्योग सुरू करण्याची लाट आली आहे. ही भागीदारी फसवी आहे व फार काळ टिकणार नाही, असे प्रस्तुत लेखिकेला तेव्हाही वाटत होते. 'टेक्नॉलॉजी ॲसिमिलेशन' 'इंन जॉइन्ट व्हेन्चर्स : द इन्डो-एम. एन. सी. एक्सपिरिअन्स' या पुस्तकात प्रस्तुत लेखिकेने ३७ कंपन्यांचे अनुभव दिले आहेत.

(१)

शिकत असताना प्रत्येक भारतीयाला अमेरिकेत जाण्याची स्वप्ने पडत असतात. त्याला वाटत असते की, अमेरिकेत आपल्या उत्कर्षाच्या अनेक संधी मिळू शकतील, आपल्या गुणांची वाहवा होईल आणि आपण प्रामाणिकपणे कष्ट केल्यास आर्थिक सुबत्तेत जगत राहू. ह्या अपेक्षेनेच भारतीय तरुण नाना खटपटी करून अमेरिकेत जायची संधी शोधत असतात.

राजीव दाभाडकर हा तरुण मनुष्य १९९१ साली मास्टर्स इन कॉम्प्युटर सायन्स हा अभ्यासक्रम शिकण्यासाठी अमेरिकेत गेला. स्वावलंबनाने शिक्षण घेण्यासाठी त्याने अमाप कष्ट केले. दोन शयनगृह असलेल्या घरात इतर ७ विद्यार्थ्यांबरोबर तो राहिला. दर आठवड्याला २० तास इतके काम त्याने विद्यापीठात निरनिराळ्या वर्गांवर शिक्षक म्हणून केले. त्याला शिक्षण शुल्क माफ होते. तरी रोजच्या खर्चाच्या पैशासाठी त्याला




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पहाटे ५ पासून दुपारी २ पर्यंत जवळच्या मोटेलमध्ये संडास धुणे, बिछाने बदलणे अशी कामे करावी लागत. नंतर तो विद्यापीठात जाऊन शिकत असे. इतके सर्व करूनही त्याला शिक्षणासाठी कर्ज घ्यावे लागले होतेच. अमेरिकेतच नोकरी करून हे कर्ज फेडावे लागणार होते.

राजीवने 'टेक्नोलॉजी सपोर्ट अनालिस्ट' म्हणून या कंपनीत ९२ साली नोकरी धरली. अमेरिकेत नोकरी करायची असेल, तर वर्क-व्हिसा (H1B) मिळवावा लागतो. बहुतेक कंपन्या आपल्या नोकरांसाठी असे वर्क व्हिसा स्वतः मिळवून देतात. तथापि राजीव दाभाडकराच्या कंपनीकडे ही व्यवस्था नव्हती. अमेरिकेत अशाही कंपन्या आहेत की, ज्या एखाद्या उमेदवाराला स्वतःकडे नोकरी असल्याचे पत्र देतात आणि व्हिसाही मिळवून देतात. अशा कंपन्यांना 'बॉडी शॉप कंपनी' असेही म्हणतात. नोकरीचे पत्र जरी बॉडी शॉप कंपनीचे असले, तरी व्हिसा मिळालेला उमेदवार नोकरी मात्र निराळ्याच कंपनीत करत असतो. राजीव दाभाडकरने नाइलाजाने एका बॉडीशॉप कंपनीची नोकरी पत्करली.

त्यामुळे असे झाले की, दाभाडकर एकाच वेळी दोन कंपन्यात नोकरी करतो आहे, अशी अधिकृत स्थिती झाली. या बॉडी शॉप कंपन्यामुळे आपली कशी परवड झाली याची कथा दाभाडकराने 'ग्रीन कॅरट – अमेरिकाज् वर्क व्हिसा क्रायसिस' या पुस्तकात सांगितली आहे.

'बॉडी शॉप कंपनी' ही आपल्याकडे एखादा मनुष्य नोकरी करतो आहे, असे दाखवून त्याला व्हिसा मिळवून देते खरी, पण त्यासाठी ती उमेदवाराकडून जबरदस्त फी तर घेतेच आणि त्याबरोबर उमेदवाराला नोकरी करणा-या कंपनीत दर तासाला जेवढे पैसे मिळतात त्यातील काही भागही उचलत असते अशा ह्या दलाल कंपन्यांचे अमेरिकेत एक मोठे जाळेच निर्माण झाले व 'बॉडी शॉपिंग' हा फायदा मिळवून देणारा धंदा झाला. या कंपन्यांना ८ ते १२ लाख रुपये दिले (म्हणजे १६ हजार ते २४ हजार डॉलर्स) की, अमेरिकेत ३ वर्षे कायदेशीररित्या राहण्याची सोय होते.

ह्या दलाली कंपन्यांमुळे प्रामाणिक व कष्टाळू परदेशी कर्मचा-यांची कोंडी होते, अशी माणसे बॉडी शॉपिंग कंपन्यांना नको असतात. लांडीलबाडी करणारी गि-हाईके त्यांना हवी असतात; कारण त्यांच्याकडून पैसे उकळता येतात. प्रामाणिक माणसांचे कसे हाल होतात त्याची काही उदाहरणे दाभाडकरने दिली आहेत.

अखिल हा मुंबईतील एका श्रीमंत उद्योगपतीचा एकतुला एक मुलगा. त्याने २००७ साली 'व्हिजन सिस्टिम्स ग्रुपस' या कंपनीत नोकरी धरली आणि व्हिसाची फी म्हणून ४ हजार डॉलर्स पाठवले. पण व्हिजन सिस्टिम्सने वेळीच पैसे न दिल्याने त्याला त्या वर्षी (२००७ साली) व्हिसा मिळाला नाही. सतत पाठपुरावा केल्यावर २००८ साली व्हिजन सिस्टिम्स व्हिसासाठीची कागदपत्रे अमेरिकन सरकारकडे दिली. पण अमेरिकन सरकारचा व्हिजन सिस्टिम्स ग्रुपवर विश्वास नव्हता. ह्या कंपनीने आर्थिक घोटाळे केले होते. थोडक्यात काय तर अखिलचे पैसे वाया गेले.

आता अखिलने दुसरा मार्ग चोखाळला. त्याने स्विडनमधील एक अभ्यासक्रम तेथे जाऊन पुरा केला. हा अभ्यासक्रम केल्यावर युरोपातील कोणत्याही देशात नोकरी करून स्थायिक होता येते. पण अखिलला अमेरिकेत जायचे होते. म्हणून त्याने स्विडीश अभ्यासक्रमाच्या प्रमाणपत्राच्या आधारे अमेरिकन व्हिसासाठी अर्ज केला. तो व्हिसा मिळण्यासाठी त्याला अमेरिकन कॉन्सुलेटमध्ये मुलाखतीत जावे लागले. तिथे त्याला सांगण्यात आले की, त्याच्या पुर्वीच्या अर्जासाठीची कागदपत्रे चुकीची असल्यामुळे त्याच्यावर ३ वर्षे अर्ज करण्यास बंदी होती. खेरीज ज्या व्हिजन सिस्टिम्सकडून त्याने अर्ज केला होता ती कंपनी देखील बंद झाली होती.

(२)

H1B व्हिसा ही पद्धती ९१ साली अमंलात आली. अमेरिकन कंपन्यांना H1B व्हिसावाला उमेदवार नोकरीवर ठेवणे फायद्याचे पडते. त्याला कमी पगार देता येतो. खेरीज अमेरिकेतील कामगार कायद्यांचा इतरांना जो लाभ होतो, तोही या उमेदवाराला घेता येत नसल्याने कंपनीचे पैसे वाचतात. पुढे १९९६ साली ह्या H1B व्हिसा पद्धतीत एक महत्त्वाचा बदल करण्यात आला अशा नोकरदाराला किमान वेतन कायदा लागू नाही अशी दुरुस्ती करण्यात आली. मग कंपन्या असे करू



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लागल्या की, कर्मचारी नेमताना त्याला कमी वेतनावर एखाद्या राज्यात नेमायचे आणि नंतर त्याची बदली मोठ्या शहरात करायची. नवीन नियमामुळे राज्यात त्याला कमी मिळणारा पगारही शहरात चालू राहतो.

अमेरिकन कंपन्यांना परदेशी कर्मचारी नेमताना दोन अटींचे पालन करावे लागते. १) या परदेशी कर्मचा-यांकडे जे कौशल्य आहे ते कोणाही स्थानिक कर्मचा-यांकडे नाही; आणि २) स्थानिक कर्मचा-याला जेवढे वेतन दिले जाते तेवढेच या परदेशी कर्मचा-यालाही दिले जाई. परंतु या अटी क्वचितच पाळल्या जातात. १९९३ साली एका अमेरिकन दुरदर्शन वाहिनीवर दाखवले गेले की, 'ह्यूलेट पॅकार्ड' या विख्यात कंपनीत कंत्राटी पद्धतीने काम करणा-या परदेशी कामगाराला ताशी १० डॉलर्स इतका नगण्य पगार दिला जाई. भारतीय कर्मचारी हा अन्याय 'थोडे दिवस कळ सोसू' या समजूतीत सहन करत असतात.

कर्मचा-याचा पगार ठरवताना व्यवसाय, शिक्षण, अनुभव आणि नोकरीचे ठिकाण अशा चार बाबी आज विचारात घेतल्या जातात. पण ऑगस्ट २००४ पुर्वी व्यवसाय व कामाचे ठिकाण या दोनच गोष्टी लक्षात घेतल्या जात. बॉडी शॉपिंग कंपन्याचे याचा फायदा फार चलाखीने घेतला होता त्याचे उदाहरण दाभाडकरने दिले आहे. 'नॉर्थ कॅरोलिना' या राज्यातील एका सिस्टिम ॲनालिस्टला सुरुवातीला वार्षिक पगार ४२,२४६ डॉलर्स होता. तर त्याच्या वरच्या स्तरावरील कर्मचा-याचा वार्षिक पगार ६९,६१८ डॉलर्स होता. व्हिसा देणा-या (बॉडी शॉपिंग कंपनीला) पगाराच्या ५% कमिशन मिळत असे. तसेच ही कंपनी भरती केलेल्या कर्मचा-यांमागे नोकरी देणा-या कंपनीकडून 'स्टाफिंग ब्रोकरेज' घेत असे. अशा रितीने दोन्हीकडून कमिशन घेऊन बॉडी शॉपिंग कंपन्या स्वतःचे उखळ पांढरे करीत. अमेरिकन कंपनीचा फायदा असा की, उच्च शिक्षित व कुशल कर्मचा-यांना थोडक्या पगाराची नोकरी देऊन बराच नफा कमवता येतो. अमेरिकेतील लेबर डिपार्टमेंटच्या डोळ्यादेखत ही नियमांची पायमल्ली होत असते. आता असे झाले आहे की, भारतीय कर्मचा-यांना भारतातच ठेवून त्यांच्याकडून अमेरिकेतील काम करून घेतले जाते. त्यामुळे अमेरिकेत गेलेल्या H1B व्हिसा धारकांच्या नोक-यांवर गदा येते आहे.

विष्णु रेड्डी वच्चोक्कलिंगम पालनीयप्पन असे दोघे अमेरिकेतील पॅसिफिक वेस्ट या बॉडी शॉपिंग कंपनीच्या मध्यस्तीने अमेरिकेत नोकरी मिळवण्यासाठी गेले. त्यांनी H1B व्हिसासाठी अर्ज करताना कंपनीच्या सांगण्यावरून असे लिहिले होते की, ऑगस्ट २००४ ते डिसेंबर २००८ या कालावधीत आपली नोकरी अर्बनडेल या गावी असणार आहे. प्रत्यक्षात असे झाले की, अर्बनडेलला या दोघांसाठी रिकाम्या जागाच नव्हत्या. त्यामुळे या दोघांना फसवणूकीच्या आरोपावरून शिक्षा झाली. अनेक बॉडी शॉपिंग कंपन्या अशा प्रकारची लबाडी करत असतात आणि त्याची शिक्षा उमेदवारांना भोगावी लागते. खुद्द अमेरिकन नागरिकांना H1B व्हिसावाल्यांबद्दल अतिशय तिरस्कार वाटत असतो. 'तुम्ही येता म्हणून आम्हांला नोक-या मिळत नाहीत' असे ते भारतीयांना बेधडकपणे सांगतात.

(३)

राजीव दाभाडकरचा उल्लेख आधी आलेलाच आहे. त्याने एका कंपनीत 'टेक्नालॉजी सपोर्ट अनालिस्ट' म्हणून नोकरी मिळवली होती हेही आपण पाहिले. ही नोकरी मिळवण्यासाठी त्याने एका बॉडी शॉपिंगकंपनीकडून H1B व्हिसा मिळवला होता. आता राजीवने दुसरीकडे नोकरी मिळवण्यासाठी ऑनलाईन अर्ज केला म्हणजे आपली माहिती देऊन नोकरी देणा-या कंपन्यांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले. त्याला अनेक कंपन्याकडून उत्तरे आली. 'न्यू जर्सी' या राज्यातील ए. टी. ॲण्ड टी या नामवंत कंपनीकडून त्याला नोकरीचे आमिष आले राजीवने तेथे नोकरी धरली. आता आधीच्या कंपनीसाठी मिळवलेला H1B व्हिसा नव्या कंपनीकडे वर्ग करायला हवा होता त्याला ४५ दिवसांची मुदत होती. राजीवने व्हिसा वर्ग करून देणारी दलाली कंपनी शोधली. त्याच्या ताशी पगारातील ३०% रक्कम त्याने या दलाली कंपनीला देण्याचे ठरवले. ह्या ३०% तील अर्धी रक्कम ही दलाली कंपनी राजीवच्या आणि कुटुंबाच्या वैद्यकीय विम्यासाठी वापरणार होती.

राजीवला दरमहा विम्याचा हप्ता म्हणून ८०० डॉलर्स


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

द्यावे लागणार होते. त्यापैकी ४०० डॉलर्स बॉडी शॉप कंपनी भरणार होती. उरलेले ४०० डॉलर्स राजीवने द्यायचे होते. तेव्हा एकूण हिशेब खालीलप्रमाणे होत होता.

१) एस ॲन्टी कंपनीने दिलेला पगार : दर ताशी ८४ डॉलर्स.

२) बॉडी शॉपी कंपनीला द्यायची रक्कम : दर ताशी २५.२० डॉलर्स.

याचा अर्थ असा की, राजीवला दरमहा १३,४४० डॉलर्स मिळणार होते व त्यातील ४,०३२ डॉलर्स बॉडी शॉपी कंपनीला जाणार होते. राजीवच्या हातात उरलेल्या ९,४०८ डॉलर्स पैकी ४०० डॉलर्स विमा हप्त्यासाठी जाणार होते. शिवाय निरनिराळे कर भरण्यासाठी आणाखी रक्कम कापली जाणार होती म्हणजे सगळे मिळून राजीवच्या हाती ५७८२.४० डॉलर्स राहणार होते. १९९३ साली ही रक्कम काही वाईट नव्हती. वर्षाचा हिशेब म्हटला तर राजीवला १,६१,२८० डॉलर्स् मिळणार होते व त्यातील ९१,१६४ डॉलर्स कापले जाणार होते.

हे सगळे करण्याला राजीव तयार झाला कारण एटी ॲन्टी कंपनीतील नोकरीत चांगली संधी आहे असे त्याला वाटत होत. उमेदवारीच्या एक वर्षाच्या काळानंतर आपण कायम होऊ आणि मग आपल्याला ग्रीन कार्ड म्हणजे कायम अमेरिकेत राहण्याचा परवाना मिळेल. अशी त्याला आशा होती. शिवाय तो एका शिक्षण संस्थेत शिकवण्याचेही काम करत होता.

असे सगळे सुरळीत चालले असताना अचानक एक दिवस त्याला 'पिंक स्लिप' म्हणजे नोकरीवरून काढून टाकण्याचे पत्र देण्यात आले. हे का झाले? एक आठवड्यापूर्वीच राजीवने बॉडी शॉप कंपनीला आपला पगार वाढवून मिळण्याची विनंती केली होती. खरे तर ही पगारवाढ त्याला ६ महिन्यापूर्वीच मिळायला हवी होती. आता त्या बॉडी शॉप कंपनीला राजीवपेक्षा कमी पैशात काम करू इच्छिणारा एक H1B व्हिसाधारक मिळाला होता. हा राजीवर मोठाच आघात होता. राजीवला कामाचा ७ वर्षांचा अनुभव होता. त्याने अमेरिकेतच शिक्षण घेतलेले होते. ए. टी ॲण्ड टी कंपनीतील नोकरी त्याने स्वतः मिळवली होती. त्याच्याशी बॉडी शॉपचा काहीही संबंध नव्हता. शिवाय राजीवच्या मध्यस्थीमुळेच ह्या बॉडी शॉप कंपनीला ए. टी ॲण्ड टी कंपनीची रिक्रुटींग कंपनी म्हणून मान्यता मिळाली होती.

अमेरिकेच्या कायद्याप्रमाणे व्हिसा मिळवून देणारी म्हणजेच बॉडी शॉप कंपनी कर्मचा-याला कामावरून काढू शकते. त्यानंतर ४५ दिवसांत कर्मचा-याला दुसरी नोकरी मिळवणे भाग पडते. तेवढ्यात नोकरी मिळाली नाही, तर त्याचा कामाचा व्हिसा चालू राहत नाही. व्हिसासाठी पुन्हा फी भरून आणि पूर्वीच्या पगाराची पावती दाखवून नवा व्हिसा मिळवावा लागतो. नवी नोकरी शोधायची तीही अशाच कंपनीत की, जिला व्हिसाधारक कर्मचारी हवे आहेत.

याच काळात राजीववर आणखी एक आपत्ती आली. त्याच्या पत्नीची तब्येत अचानक बिघडली व तिला इस्पितळात दाखल करावे लागले. तेव्हा हे उघड झाले की, त्याच्या व्हिसा कंपनीने त्याच्या पगारातून जे दरमहा ४०० डॉलर्स कापून घेतले होते ते विमा कंपनीकडे भरलेच नव्हते. राजीवने बरीच खटपट करून कसेबसे ३८०० डॉलर्स गोळा केले व इस्पितळात भरले. उरलेली रक्कम इस्पितळाने दयाबुद्धीने माफ केली.

राजीवने त्याच्या व्हिसा कंपनीला फोन केला. त्यानंतर असा व्यवहार ठरला की, व्हिसा कंपनीने त्याला नोकरी देऊन वर दरमहा ८०० डॉलर्सचा चेक द्यायचा. त्याच्या बदल्यात राजीवने व्हिसा कंपनीला दर पंधरवड्याला ११५० डॉलर्स द्यायचे. हा सर्व खटाटोप अमेरिकेत कायदेशीरपणे राहता यावे म्हणून. राजीव नोकरीच्या खटपटीत होताच. त्याला व्हिसा कंपनीच्या मध्यस्थीशिवाय इंटेल कॉर्पोरेशनमध्ये नोकरी मिळाली. राजीवला वाटले की, आता आपण व्हिसा कंपनीच्या कचाट्यातून सुटलो. पण कसे काय व्हिसा कंपनीने इंटेलकडे १०,००० डॉलर्स मागितले; कशासाठी तर व्हिसा कंपनीने राजीवला आपल्या रजिस्टरवर ठेवले होते आणि त्याला प्रशिक्षण दिले होते म्हणून इंटेल कंपनीने ही रक्कम देण्यास नकार दिला. तेव्हा व्हिसा कंपनीने राजीवचा व्हिसा इंटेल कंपनीकडे सुपूर्त करण्याचे नाकारले. अशा रितीने नोकरीची ही संधी गेली. दरम्यान व्हिसा कंपनीला दर पंधरवड्याला ११०० डॉलर्स द्यायचे होते. ते राजीव देऊ


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शकलाच नव्हता.

राजीवने मग दुसरी व्हिसा कंपनी शोधली. या कंपनीकडून H1B व्हिसा मिळवण्यासाठी आधीच्या पगाराच्या पावत्या दाखवण्याची गरज नव्हती. मात्र या कंपनीशी करार करताना राजीवला १८०० डॉलर्स इतकी वकीलाची फी द्यावी लागली. व्हिसा मिळून व्हिसा कंपनीने ज्या कंपनीत नोकरी मिळवून दिली तिथे ३ महिने काम केल्यानंतर त्याला ९०० डॉलर्स परत मिळणार होते.

यानंतर १५ दिवसांत राजीवला न्युयॉर्क मधील वर्ल्ड ट्रेड सेंटरमध्ये ऑफीस असलेल्या मेरील लिन्च या कंपनीत नोकरी मिळाली. आपला व्हिसा या कंपनीकडे हस्तांतरित करावा असा अर्ज त्याने व्हिसा कंपनीकडे केला. सुदैवाने ते मान्य केले. पण इतक्यात दुर्दैवाचा मोठा फटका बसला. ११ सप्टेंबर २००१ रोजी अतिरेक्यांच्या घातपाताने वर्ल्ड ट्रेड सेंटर जमीन दोस्त झाले. त्या अपघातात राजीवचा व्हिसा आणि महत्त्वाचे कागदपत्र नाहिसे झाले.

यानंतर अमेरिकेतील भारतीयांना नाना त-हांच्या छळाला तोंड द्यावे लागले. एका रात्री तो दूध आणायला मोटरने चालला असताना पोलिसांच्या गाडीने पाठलाग करून त्याला अडवले व ड्रायव्हिंग लायन्सेस मागितले ते बघून पोलीस त्याला म्हणाला की, ३ महिन्यांपूर्वीच पार्किंग चार्जेस न भरल्यामुळे, त्याचे लायसेन्स रद्द करण्यात आले आहे. त्याला पोलीस कोठडीत डांबण्यात आले. त्याच्या मित्राने रात्री ११.३० वाजता येऊन त्याला जामीनावर सोडवले. ११ सप्टेंबर नंतर अमेरिकेत असे प्रकार वारंवार घडत होते. तो ज्या वस्तीत रहात होता ती सदन गो-या लोकांची वस्ती होती. शेजा-यापाजा-यांनी त्याला जागा सोडण्यासाठी धमक्या दिल्या होत्या. एका रात्री त्याच्या गाडीचा चक्काचूर करून टाकण्यात आला.

व्हिसा नष्ट झाला असल्यामुळे व्हिसा कंपनीने त्याला पगार देणे बंद केले होते. बायकोचे आजारपण, नोकरी गेलेली यामुळे तो कर्जबाजारी झाला होता. त्याच्या हातात फक्त १५० डॉलर्स उरले होते. तेव्हा मित्राकडून पैसे उसने घेऊन राजीव सहकुंटूंब भारतात परत आला.

२००४ साली परतल्यावर राजीवने H1B व्हिसाच्या जाळ्यात सापडलेल्या लोकांची पिळवणूक थांबून त्यांना न्याय मिळवून देण्यासाठी NO STOPS नावाची संस्था काढली. या संस्थेचे सुमारे १० लाख सभासद आहेत. अमेरिकेच्या गृहसुरक्षा विभागाने व ब्रिटीश सरकारनेही या संस्थेच्या कामाची दखल घेतली आहे. या संस्थेचे काम करताना राजीवला अनेकदा जीवे मारण्याच्या धमक्या मिळाल्या व कित्येकदा मारहाणही झाली.

(४)

१९४० ते ४२ च्या दरम्यान रोजगार मिळवण्यासाठी भारतीय लोक अमेरिकेत मोठ्या प्रमाणावर जाऊ लागले. अमेरिकेत रेल्वेची बांधकामे चालू होती व तेथे मजुरांचा तुटवडा भासत होता. या भारतीय मजुरात शीख मजुर मोठ्या संख्येने होते. परदेशी कामगारांना अमेरिकेत नेमण्याची पद्धत तेव्हा अतिशय सुटसुटीत होती. मजुराला काम करण्याचे कौशल्य असल्याचे शिफारस पत्र असेल की भागेल. परंतु, ते शिफारस पत्र देण्यातही भ्रष्टाचार होत असे. व्हिसा मिळण्यासाठी लागणा-या कागदपत्रांची संख्या वाढू लागली. तसतसा भ्रष्टाचारही वाढू लागला. १९४२ सालानंतर ही पद्धत बदलली आणि ब्रासशे प्रोग्रॅम खाली कामगारांची भरती अमेरिकेत होऊ लागली. ४२ पासून ६४ पर्यंत २२ वर्षे हा प्रोग्रॅम राबविण्यात आला. या काळात ४५ लाख मेक्सिकन मजूर अमेरिकेत आले. या मजुरांना अमेरिकेत आणणारे जे मक्तेदार असत त्यांनी मजूरांना नियमित वेतन आणि राहण्यासाठी घर दिले पाहिजे असा नियम होता. मजुराला मिळणा-या पगारापैकी १०% पगार कापून घेतला जाई आणि मजुर स्वदेशात जायला निघाला की, त्याला ते पैसे एकत्र द्यावेत असे ठरलेले होते. पण कंत्राटदार हे पैसे कधीच देत नसत.

१९९० साली H1B व्हिसा ही पद्धत सुरू झाली. ह्या वेळेला भरती केलेले कामगार हे उच्चशिक्षित होते. भरती करून आणणा-या मक्तेदारांनी कर्मचा-यांना प्रवासाचा खर्च द्यावा, राहायला घरे द्यावीत, नियमित पगार द्यावा याविषयी अनेक नियम होते. पण हे मक्तेदार यातले कोणतेच नियम पाळत नसत. बरे काही कंत्राटदार कायदे पाळत नाहीत. असे सिद्ध झाले तरी अमेरिकन सरकार त्यांचे परवाने चालूच ठेवीत असे. (कामगाराला मिळणारा पगार तो नोकरी करत असलेल्या कंपनीकडून परस्पर न मिळता कंत्राटदाराच्या माध्यमातून मिळत


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असतो.) H1B व्हिसा खाली १०८ प्रकारची कामे करण्यासाठी कामगार आणता येत होते. या व्यवसायात शिक्षक, अर्किटेक्टस्, डॉक्टरर्स, वकील, प्रोग्रॅमर्स, पत्रकार, नट अशा अनेक व्यवसायांचा समावेश होता.

नंतर अमेरिकेत कर्मचा-यांची तात्पुरती भरती करणा-या संस्था निर्माण झाल्या. त्यांना 'हेड हंटर्स' असे म्हणत. ज्या कंपन्यांना ते तात्पुरते कामगार हवे असत त्या कंपन्या कामगारांना स्वतः पगार देत आणि हेड हंटर कंपन्याना कमिशन देत. मालक असणा-या संस्था कमिशनची रक्कम कामगारांच्या पगारातून कापुन घेत. कामगारांचा व्हिसा मालक कंपन्या मिळवून देत असत. पुढे असे झाले की, मालक कंपन्यांनी हा व्हिसा मिळवण्याची जबाबदारी हेड हंटर कंपनीकडे द्यायला सुरुवात केली आणि यातूनच ही हंटर कंपनी एक प्रकारची बॉडी शॉप कंपनी झाली. मग ह्या कंपन्या भरती झालेल्या प्रत्येक कर्मचा-यांकडून त्याच्या ताशी पगारावर दलाली (कमिशन) घेऊ लागल्या.

यातून दुहेरी मालक निर्माण झाले, व्हिसा मिळवून देऊन नोकरीत भरती करणारा पहिला मालक आणि प्रत्यक्ष काम करून घेणारा दुसरा किंवा मुख्य मालक. व्हिसाच्या मुदतीत हा परदेशी कर्मचारी एक प्रकारे बांधील कामगार (बाँडेड लेबरर) असतो, एका मुख्य मालकाकडचे काम संपले, तरी हा परदेशी कामगार व्हिसा कंपनीच्या रजिस्टरवर असल्यामुळे ती कंपनी त्याला कमी पगारावर दुस-या मुख्य मालकाकडे पाठवते. कर्मचा-याची गरज असणा-या या दुस-या मुख्य मालकाकडून घासाघीस करून ती आणखी कमिशन मागून घेते. दुस-या बाजूने बेकार H1B व्हिसा धारकांच्यातही नोकरीसाठी स्पर्धा असतेच. त्यामुळे ही वेतनाची मान खाली येते. परिणाम असा होतो की, राज्यातील कायद्याने ठरविलेल्या किमान वेतनापेक्षासुद्धा कमी वेतन H1B कर्मचा-याला मिळू लागते.

H1B व्हिसा धारकावर अवलंबून असणा-या त्याच्या कुटूंबातील व्यक्तिंना H-4 (डिपेंडंट व्हिसा दिला जातो) अशी अवलंबित माणसे आल्यावर तर H1-B धारकांची परिस्थिती आणखीच धोक्याची होती. जर त्याची नोकरी गेली तर नव्या नोकरीसाठी H1-B व्हिसा धारकाला वणवण करावी लागते. अशा स्थितीत हे H1-B व्हिसा धारक मिळतील ती कामे उदा. वेटर, गाडी धुणारा, विक्रेता इ. करतात. अशा कामगारांना आरोग्य विमा किंवा तत्सम फायदे कधीच मिळत नाहीत. तो पुर्णपणे नाडलेला राहतो.

बहुतेक अमेरिकन कंपन्या परदेशी कामगारांची भरती करण्यासाठी H1B पेक्षा L-1 व्हिसा देणे पसंत करतात. कारण H1B व्हिसा धारकाला पगार देणे बंधनकारक आहे. तर L-1 व्हिसा धारकाला नुसता भत्ता देणे पुरेसे आहे. L-1 व्हिसातही दोन प्रकार आहेत. L-1 A आणि L-1 B त्यातला पहिला व्हिसा वरच्या दर्जाच्या अधिका-यांना दिला जातो, तर दुसरा व्हिसा विशेष कौशल्य असणा-या कर्मचा-यांसाठी असतो.

अमेरिकेत दरवर्षी किती जणांना H1-B द्यायचा ती संख्या ठरलेली आहे. सध्या ती संख्या ६५ हजार आहे. या व्यतिरिक्त २० हजार व्हिसे अमेरिकेत शिक्षण घ्यायला येणा-यांसाठी राखून ठेवले आहेत. L-1 व्हिसासाठी मात्र संख्येची मर्यादा नाही.

अमेरिकेत कायमचा निवास करण्यासाठी ग्रीन कार्ड लागते. हे कार्ड मिळण्याची पहिली पायरी म्हणजे H1B व्हिसा. तथापि H1B व्हिसा धारकांपैकी फारच थोड्यांना ग्रीन कार्ड मिळते. १९९० च्या दशकात एकूण H1B व्हिसा धारकांपैकी फक्त निम्म्या लोकांनाच ग्रीन कार्ड मिळू शकाले. कर्मचारी ज्या कंपनीत नोकरी करतो तिने कर्मचा-याला ग्रीन कार्ड देण्याची शिफारस करायची असते. L-1 व्हिसा धारकांची स्थिती याहूनही वाईट असणार हे स्पष्टच आहे.

फ्रेबुवारी २०१० मध्ये झालेल्या संशोधनात असे आढळून आले की, २००२ साली अमेरिकेत जे व्हिसा धारक होते त्यातील १०% लोक भारतीय होते. २००५ साली ही संख्या ४८% इतकी वाढली. चालु जमान्यात H1B व्हिसा धारकांची मोठी परवड होते. हे खरेच आहे शिवाय या बाहेरच्या लोकांमुळे अमेरिकेतील बेकारी वाढते हेही निर्विवाद असे असतानाही अमेरिकन कंपन्या परदेशी कर्मचारी आणण्याला उत्सुक असतात, याचे कारण असे की, त्यातून त्यांचे तीन फायदे होतात.

१) परदेशी कर्मचा-यांकडुन स्वस्तात काम करून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेता येते. तेच काम करणा-या अमेरिका नागरीकापेक्षा परदेशी कामगाराला दरवर्षी साधारण १०,००० हजार डॉलर्स कमी दिले जातात.

२) अलीकडे आय. टी. कंपन्या कामगारांना परदेशातच ठेवून इंटरनेटवरून त्यांच्याकडून कामे करून घेतात. त्याला आऊटसोर्सिंग म्हणतात. पण अनेकदा अशा कामगारांशी प्रत्यक्ष विचारविनिमय करणे जरूरीचे असते. अशा वेळी तो कामगार हाताशी, म्हणजेच अमेरिकेत असणे फायद्याचे ठरते.

३)प्रत्यक्ष कामाच्या ठिकाणी कर्मचारी नवे तंत्रज्ञान शिकला व मग मायदेशी जाऊन इंटरनेटवरून तेच काम करू लागला, तर नोकरी देणा-या कंपनीला त्याच्याकडून काम करून घेणे स्वस्तात पडते.

खरे तर नोकरी मिळाल्यानंतरच H1B व्हिसा देण्यात यावा, असे कायद्यात म्हटले आहे. परंतु अनेक अमेरिकन कंपन्या हाताशी नोकरी नसतानाही इतर देशातून कर्मचारी आणतात. त्यांना 'राखीव कर्मचारी' असे म्हणतात. आवश्यकता भासेल तेव्हा या राखीव कर्मचा-यांकडून कमी पगारात काम करून घेतले जाते.

खरे पाहता H1B व्हिसा मिळवून अमेरिकेत जाणा-या लोकांमध्ये त्या जाण्यामागील अडचणींच्या बाबतीत जागृती करणे महत्त्वाचे आहे. परदेशी गेलेल्या भारतीयांकडून भारतीय अर्थव्यवस्थेला अप्रत्यक्षरित्या फायदा होत असल्याने लोकांनी परदेशी जाण्याला आपल्याकडे उत्तेजनच दिले जाते. त्यामुळेच बॉडी शॉपिंग कंपन्यांचा सुळसुळाट झाला आहे.

२००८ सालापासून अमेरिकेत बेकारी वाढली. H1B व्हिसा धारक मोठ्या संख्येने उपलब्ध असल्यामुळे वेतनाचे दर घटले व कर्मचा-यांचे शोषण होऊ लागले. अमेरिकन कंपन्या आपल्याकडील व्हिसाधारक नोकरी सोडून दुसरीकडे गेला की त्याला काळ्या यादीत टाकू लागले व काळ्या यादीतील व्यक्तिंना नोकरी देऊ नये असा समझोता या कंपन्यात अंतस्थरित्या झाला.

(५)

भारतीय लोकांच्या अमेरिकेतील छळाचे मूळ कारण अमेरिका व्हिसा कायद्यात आहे. हे राजीवने स्वतःच्या अनुभवावरून ओळखले. १२ वर्षे अमेरिकेत काढून तो कफल्लक होऊन भारतात परतला होता. हे कसे होऊ शकते हे भारतातील भारतीयांना समजूच शकत नाही. त्यामुळे राजीवने No Stops संस्थेचे काम सुरू केले तेव्हा लोकांना त्या संस्थेचे आगत्य वाटले नाही. मग राजीवने 'इण्डो-अमेरिका' संस्थेचे अध्यक्ष (कै. डॉ. अरुण वकील) यांची भेट घेतली. 'गेट वे टू अमेरिका' या पुस्तकामुळे ते प्रसिद्ध झाले होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली राजीव इंटरनेटवर सतत H1B व्हिसा धारकांच्या प्रश्नांवर लिहू लागला. नंतर वॉशिंग्टन इथून प्रसिद्ध होणा-या 'कॉम्प्युटर वर्ल्ड' या मासिकात त्याची मुलाखत छापून आली होती. त्यामुळे अमेरिकन नागरिकांनाही त्याच्या कामाची माहिती झाली. डॉना कॉन रॉय या महिलेशी त्याची इंटरनेटच्या माध्यमातून अधिक ओळख झाली. ई-मेल वरून तिच्याशी बोलताना राजीवने लिहिले होते. "खुद्द तुमच्या देशात तुझ्यासारख्या नागरिकाला न्याय मिळत नसेल, तर परदेशी लोकांना कोठून मिळणार?" डॉनॉने ही ई-मेल तिच्या संपर्क यादीतील सर्वांना पाठवली आणि काय आश्चर्य! राजीवला अनेक अमेरिकनांचा पाठिंबा मिळाला. त्यांना हे समजले की, राजीवचा उद्देश केवळ H1B व्हिसा धारकांना न्याय मिळवून द्यावा इतकाच नसून अमेरिकन कर्मचा-यांचे हक्क ही अबाधित राहवेत असा आहेत. काही महिन्यानंतर डॉना कॉन रॉय हीने स्वतःची 'फ्युचर जॉब्ज' नावाची संस्था काढली आता या दोन्ही संस्था परस्पर सहकार्याने कर्मचा-यांचे प्रश्न सोडवित असतात.

आतापर्यंत या संस्थानी व्हिसा घोटाळ्याची अनेक प्रकरणे उजेडात आणली आहेत. अमेरिकेत नोकरीसाठी गेलेले अनेक भारतीय राजीवला कळवित की, ज्या कंपनीत नोकरीत करण्यासाठी व्हिसा मिळाला होता ती कंपनी अस्तित्वात नाही! कर्मचा-यांचे पगार वेळेवर न होणे हे नित्याचेच. बे-हिशेबी काळा पैसा करणे, मानवी हक्कांची पायमल्ली करणे अशा गैरव्यवहाराचीही असंख्य उदाहणे होती. राजीवने टि. व्ही. चॅनेलर्सच्या लोकांना हे कळवले, तेव्हा त्यांचा विश्वासच बसला नाही. CNBC टि. व्ही- १८ या चॅनेलने राजीवच्या सहकार्याची मदत घेऊन छुप्या कॅमे-यांच्या साहाय्याने असे दाखवून दिले की, एजंट लोक खोट्या कंपन्या निर्माण करून गरजूंना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फसवतात.

राजीवचे सहकारी आणि हे नोक-या देणारे ऐजंट यांच्यात खालीलप्रमाणे संवाद झाला.

एजंट-आम्ही तुम्हाला एका खोट्या कंपनीच्या मालक मिळवून देऊ तो अमेरिकन नागरीक आहे. तुम्हाला H1B व्हिसा मिळवण्यासाठीचा अर्ज भरून देईल.

सहकारी - अमेरिकेत पोचल्यावर काय होईल?

एजंट - हा अर्ज दाखल करणारा मालक तुम्हाला वर्क परमिट देईल व एक ना-हरकत प्रमाणपत्रही देईल. म्हणजे तुम्हाला (या खोट्या कंपनीने दिलेली नोकरी सोडून) दुसरी नोकरी शोधता येईल.

सहकारी - तुम्ही अमेरिकेत नोकरी मिळवून द्याल का?

एजंट - तुम्ही एकदा तिकडे पोचलात की, आमची माणसे तुम्हाला मदत करतील.

सहकारी - यासाठी किती खर्च येईल.

एजंट - २२५० डॉलर्स इतकी इमिग्रेशन फी आणि तितकीच वकीलाची फी.

सहकारी - अशा पद्धतीने खूप लोक अमेरिकेला जात आहेत का?

एजंट - ज्यांचे नातेवाईक तिकडे आहेत, असे पुष्कळ जण याच पद्धतीने अमेरिकेत जातात.

सहकारी - खरी नोकरी मिळायला किती दिवस लागतील.

एजंट - अमेरिकेत नोक-यांना तोटा नाही. नोकरी मिळण अवघड नाही. व्हिसा मिळणं अवघड आहे. आम्ही अशी व्यवस्था करू की, तिथे गेल्यावर तुम्हाला नोकरीसाठी मुलाखतींची आमंत्रण येतील. मुलाखती दिल्या की काम झाल!

अशा रितीने या एजंटामार्फत पुष्कळ भारतीय अमेरिकेत पोचले होते. रमेश नावाच्या एका इंजिनिअरने कॅलिफोर्नियातून CNBC चॅनेलला फोन वरून सांगितले की, त्याने ३००० हजार डॉलर्स भरून व्हिसा मिळवला. पैसे हातात पडेपर्यंत ऐजंट गोडगोड बोलला नंतर त्याने कानावर हात ठेवला.

रमेश अमेरिकेत पोचल्यानंतर त्याने ऐजंटच्या ताब्यातून आपले कागदपत्र मिळवण्याची खटपट सुरू केली.

रमेश निदान अमेरिकेत पोचला तरी पण मनोजची तर चित्तरकथाच झाली. हैद्राबादेत एका आंतरराष्ट्रीय कंपनीत त्याला चांगली नोकरी होती, पण अमेरिकेत जाण्याची हौस असल्याने त्याने एक ऐजंट गाठला. त्या एजंटला त्याला एक अमेरिकन फोन नंबर मिळवून दिला. त्या फोनवरून आपण अमेरिकेचे रहिवासी आहोत असे भासवत त्याने अनेक अमेरिकन कंपन्यांना मुलाखती दिल्या. फोनवरून मुलाखत झाल्यावर तो अमेरिकेतच आहे, असे समजून नोकरी देणारी कंपनीने त्याला ताबडतोब कामावर रुजू व्हायला सांगितले. पण व्हिसा नसल्यामुळे त्याचे अमेरिकेत जाणे बारगळत असे.

व्हिसा मिळवण्यासाठी अनेक प्रकारच्या लांड्या लबाड्या चालतात याची अमेरिकेतील वकीलांना माहिती आहेच. मुंबईतील अमेरिकेच्या उपवकिलातीत तिचे प्रमुख यानी एका मुलाखतीत सांगितले होते की, "कित्येक भारतीय तिकडे अस्तित्वात नसलेल्या नोक-यांसाठी जाऊ इच्छितात. आपण तिकडे काय काम करणार आहोत याची त्यांना अजिबात कल्पना नसते. आम्ही चौकशी करतो तेव्हा आम्हाला कळते की, ह्या कंपन्या कोणताच व्यवसाय करत नाहीत. आम्ही दरवर्षी ६५ हजार व्हिसे देतो. (हे सर्व देशातील नागरीकांना मिळून) त्यासाठी २०१४ साली दीड लाख लोकांनी अर्ज केले होते, त्यातले ६० हजार अर्ज भारतीयांचे होते. पुष्कळ अर्ज संशयास्पद होते. हैद्राबाद आणि बंगलूर ही H1B व्हिसांच्या गैरव्यवहारांची केंद्रे आहेत. तेथील कितीतरी एजेंटांकडे आम्ही आमच्या कर्मचा-यांना चौकशीसाठी पाठवले आहे."

एका एजंटाने राजीवच्या सहका-यांना विचारले की, 'तुम्ही एवीतेवी व्हिसासाठी भली मोठी मोठी रक्कम दिलेली असतेच, मग अमरिकेत गेल्यावर वेटरचं किंवा मोटार धुणा-याचं काम केलत तर बिघडल कुठे? पण अमेरिकेच्या वकिलातीच म्हणणे असे आहे की, अशा त-हेचे काम असे जाऊन करणं हे बेकायदेशीर आहे. कारण तुम्हाला व्हिसा दिलेला असतो, तो तुमच्या शैक्षणिक पात्रतेशी मिळत्या जुळत्या कौशल्याचे काम करण्यासाठी. ते न करता तुम्ही जर मोटार धुण्याची काम करू लागलात तर तो व्हिसाचा दुरुपयोग होईल.'

२०१५ साली म्हणजे गेल्या वर्षी एकुण ६५ हजार


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्हिसांपैकी २० हजार व्हिसे भारतातील ९ संगणक तंत्रज्ञान कंपन्यांना मिळाले. इंफोसिस, टाटा कन्स्लटन्सी, विप्रो आणि सत्यम या कंपन्यांना सर्वात जास्त व्हिसे मिळाले. तथापि मिळालेल्या व्हिसांची संख्या मागितलेल्या व्हिसांच्या संख्येपेक्षा फारच कमी होती. जरूरीपेक्षा व्हिसे कमी मिळाले की, ह्या कंपन्या अमेरिकेतच जे H1B व्हिसाधारक असतात त्यांना कामावर घेतात. अशा वेळी ज्या एजेंटांच्या मार्फत ह्या स्थानिक व्हिसा धारकांनी व्हिसे मिळवलेले असतात ते एजेंट भरती होणा-या लोकांकडून दामदुपटीने कमीशन तर उकळतातच पण ज्या खोट्या कंपन्याच्या नोकरीच्या नावावर H1B व्हिसा मिळाला होता त्या खोट्या कंपन्यांच्या नावे पगाराच्या २५ ते ४५.१ रकमेची वसूली करतात.

व्हिसा दलालांच्या या फसवणूकीविषयी कोणीच उघडपणे बोलत नाही. सगळं कसं छान चालल आहे, असे सांगण्याकडेच या पोळलेल्या लोकांचा कल असतो. याचे एक कारण म्हणजे भारतातील आपल्या गोतवळ्यात आपल्या फजितीचे हासे होण्याची त्यांना भिती वाटते. हा नाहीतर दुसरा दलाल आपल्याला चांगली नोकरी मिळवून देईल. या आशेवर ते फरपटत राहतात.

२००० साली अमेरिकेने लॉटरी काढून व्हिसे देण्याचा प्रयोग पहिल्यांदा केला. तेव्हा ३ जून रोजी अमेरिकेतील H1B व्हिसा धारकांनी आजारीपणाची सामुदायिक रजा घेऊन एक दिवसाचा संप केला. आपल्या परवडीकडे अमेरिकन सरकारचे लक्ष वेधून घेण्यासाठी असा संप करावा ही सूचना No STOPS या संस्थेचीच. हा वेळपर्यंत राजीवच्या कामाची माहिती अमेरिकन सरकारपर्यंत पोचली होती. तेव्हा या प्रश्नांचा अभ्यास करण्यासाठी अमेरिकन सरकारने राजीवला अमेरिकेत बोलावून घेतले.

दोन दिवसानी राजीव शिकागोला पोचला. तेथे त्याला इमिग्रेशन ऑफिसमध्ये जावे लागले. 'आपण अमेरिकन कॉंग्रेससमोर H1B व्हिसाच्या गैरव्यवहारांबद्दल माहिती द्यायला आलो आहे.' असे सांगितल्यावर त्या अधिका-यांनी आपल्या सहका-यांना बोलावून घेतले. राजीवने त्यांना उत्साहाने जवळजवळ २० मिनिटे H1B व्हिसाच्या व्यवस्थित होणारे घोटाळे, व्हिसा धारकांना होणारी गळचेपी व पिळवणूक यांची माहिती दिली. त्यामुळे तेथील सर्व अधिकारी प्रभावित झाले. मुख्य अधिकारी तर त्याला म्हणाला की, "पुन्हा येशील तेव्हा मी स्वतः तुझ्या व्हिसाची मुदत वाढवून देईन. तुला तुझ्या कामात यश मिळो. नंतर राजीवने या विषयावर अनेक ठिकाणी भाषणे दिली व सर्व परिस्थिती समजावून सांगितली."

२ जानेवारी २००७ रोजी राजीव व डॉना यांनी सिनेटर्सच्या भेटी घेतल्या व त्यांना 'अमेरिकन वर्क परमिट- ऑफिशियल रूल्स अॅण्ड रेग्युलेशनस ऑफ अमेरिकन वर्क व्हिसा या आपल्या पुस्तकाच्या प्रती दिल्या. या सगळ्या प्रयत्नांमुळे राजीव व डॉना यांना ७ सिनेटर्सनी व्हिशाच्या अडचणीच्या संदर्भात चर्चा करायला बोलावले. पाच तास ही चर्चा चालली होती. परिणाम असा झाला की, H1B व्हिसा फ्रॉड अॅण्ड अॅब्युझ प्रिव्हेंशन अॅक्ट ऑफ २००७ या नावाचे विधेयक तयार करण्यात आले. यात व्हिसा धारकांच्या अडचणींच्या संदर्भात अनेक महत्त्वाच्या तरतुदी करण्यात आल्या होत्या.

त्यातील महत्त्वाची तरतुद अशी होती की, 'नवीन कर्मचा-यांची भरती करताना व H1B व्हिशासाठी अर्ज मागण्यापूर्वी ३० दिवस आधी कंपनीच्या मालकाने अमेरिकेतील डिपार्टमेंट ऑफ लेबरच्या वेबसाइटवर नोकरीची जाहिरात देणे आवश्यक आहे. त्याचबरोबर किती व्हिसा धारकांचे अर्ज आले आहेत त्याची माहिती वेळोवेळी दिली पाहिजे.' दुसरी महत्त्वाची तरतुद म्हणजे 'कर्मचा-यांची व्हिसा कागदपत्रे कंपनी रोखून ठेवू शकणार नाही. कर्मचा-याला पाहिजे तेव्हा ती त्याला उपलब्ध करून दिली पाहिजेत.'

राजीव भारतात परतल्यानंतर ज्या सिनेटर्सनी वरील विधेयक तयार केले होते. त्यांनी भारतातील ९ प्रमुख माहिती व तंत्रज्ञान कंपन्याना पत्रे पाठवली त्यात त्यांनी या कंपन्यांच्या लक्षात खालील गोष्टी आणून दिल्या.

१) 'प्रोग्रॅमर्स गिल्ड' या संस्थेने दिलेल्या माहितीनुसार तुमच्या कंपन्यात परदेशी कर्मचा-यांना मिळणारा पगार अमेरिकेतील नवीन पदवीधारकांना मिळणा-या पगारापेक्षा फारच कमी आहे.

२) तुमच्यासारख्या २० कंपन्यांनी H1B व्हिसा धारकांना कामावर घेतले आणि त्यांना दुस-या कंपन्यांकडे पाठवले.

३) अनेक कंपन्यांनी अमेरिकनांना कामावरून काढून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

टाकून त्यांच्या जागी H1B व्हिसा धारकांना नेमले आहे.

या नंतर त्यांनी या कंपन्यांना अनेक प्रकारची माहिती विचारली व खालील प्रश्नांची उत्तरे पाठवा असे बजावले ते प्रश्न असे.

१) तुमच्या कंपनीत H1B व्हिसा धारकांचे सरासरी (आणि कमाल व किमान) वेतन कमी आहे? तेच काम करणा-या तुमच्या कंपनीतील अमेरिकन नागरीकांचे वेतन किती आहे?

२) २००६ साली (म्हणजे हे प्रश्न विचारण्याच्या आदल्या वर्षी) तुम्हाला मिळालेल्या एकूण व्हिसांपैकी किती व्हिसा धारकांना तुम्ही कामावर ठेवले आहे व त्यांना किती वेतन देत आहात? किती व्हिसा धारकांना तुम्ही दुस-या कंपन्यांकडे पाठवले आहे? आणि किती जणांचा पगार दुस-या कंपन्यांकडून होत आहे?

३) तुम्ही २००५ व २००६ साली कामावरून किती कर्मचा-यांना कमी केले? ते कोणते काम करीत होते? कमी केलेल्यांपैकी किती जण H1B व्हिसाधारक होते? अमेरिकन कर्मचा-यांना कामावरून कमी करून तुम्ही तेथे H1B व्हिसाधारक नेमले आहेत काय?

सिनेटर्सचे हे पत्र येताच या कंपन्यांनी आपल्याकडील व्हिसा धारकांची संख्या कमी केली. एका कंपनीने तर राजीवला बंगलोरला बोलावून घेऊन अमेरिकन न्याय विभाग आपल्यावर काय कारवाई करील याची माहिती विचारली व माहितीच्या मोबदल्यात १० लाख रुपये देणगी देण्याची तयार दाखवली. तथापि राजीवने अशी देणगी घेण्यास ठाम नकार दिला. यानंतर वरील सिनेटर्सनी केलेल्या विधेयकाचे कायद्यात रुपांतर झाले.

व्हिसा धारकांच्या प्रश्नासाठी राजीव दाभाडकराने केलेले प्रयत्न लोकांच्या कौतुकाचा विषय ठरला. त्याला संयुक्त राष्ट्र स्वयंसेवी संघटनेने २०१४ साली 'कर्मवीर चक्र फॉर सोशल जस्टिस' हा बहुमान दिला.

**संदर्भग्रंथ –**

१) अभ्यंकर अजित - अमेरिकेतील पोलिसी दंडेली. (लोकसत्ता ८/८/२०१६)

२) दाभाडकर राजीव - ग्रीन कॅर्ट, अमेरिकाज वर्क व्हिसा क्रायसिस (पेंग्विन (यु. एस. ए) २०१४).

३) अलेक्झांडर, मिशेन - द न्यू झिप क्रो (द न्यू प्रेस २०१२)

४) खेर सी. पं - एका आर्थिक मारेक-याचा कबुली जबाब (अनुवाद), (सारवेद २००८).

**टिप –** श्रीमती किरण खेर यांचा हा लेख त्यांच्या आगामी 'नाण्याची दुसरी बाजु' या ग्रंथात समाविष्ट केला गेला आहे. **-संपादक**

प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमाला, वाई

हिंदुधर्माची समीक्षा (चौथी आवृत्ती)

आणि

सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती)

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

पृष्ठे : २९५ किंमत रु. ३००/-

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# श्री शंकराचार्य, श्री ज्ञानेश्वर व लोकमान्य टिळक – भगवद्गीतार्थ समन्वय (उत्तरार्ध)*

मो. वि. पटवर्धन

श्री शंकराचार्यांची जी निरनिराळी स्तोत्रे उपलब्ध आहेत त्यात ज्ञानमार्ग, ध्यानमार्ग, भक्तिमार्ग व कर्ममार्ग ह्यांचा बिलक्षण समन्वय आहे. त्यांतच त्यांनी अद्वैत कल्पनेच्या मर्यादाही दिल्या आहेत. "भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित्। अद्वैतं त्रिषुलोकेषु नाद्वैतं गुरुणासह।।" आपल्या भावनेत म्हणजे वैचारिक बैठकीत अद्वैत नेहमी असावे, पण कर्म करणेचे ठिकाणी अद्वैतास स्थान देऊ नये. तिन्ही लोकात अद्वैत मानले, तरी गुरू व आपणात अद्वैत प्रतिपादू नये. ह्यावरून प्रत्यक्ष व्यवहारात अद्वैताचे स्थान कोणते असावे ह्याबद्दलचे त्यांचे विचार दिसून येतात व त्यांची दृष्टी किती विशाल व सर्वसंग्राहक होती हे दिसून येते. गीतेत ज्ञानमार्ग व कर्ममार्ग हे दोन्ही आहेत असे श्री शंकराचार्यांनी म्हटलेले आहे व गीतेतही त्याला भरपूर आधार आहे.

**"ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे की नाही?" यासंबंधीच्या भूमिका**

ह्यानंतरचा दोघांच्या विचारातील फरक म्हणजे ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे का नाही हा होय. श्री शंकराचार्य स्पष्टपणे म्हणतात की, 'ज्ञानोत्तर कर्म शक्य नाही.' श्री लोकमान्य टिळक ह्यांचे त्याला असे उत्तर आहे की, स्वतः श्री शंकराचार्यांच्या विशाल जीवनाकडे पाहिल्यास हा प्रश्नच उद्‌भवत नाही. श्री शंकराचार्य ज्ञानी होते ह्याबद्दल कोणाचेही दुमत असणे शक्य नाही. इतके असून त्यांनी आपल्या जीवनाच्या उत्तरार्धात अद्वैत मतप्रणाली स्थापन करण्याचे महान कार्य केले त्यावरून ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे असा निष्कर्ष काढण्याशिवाय गत्यंतर नाही. तसेच गीता जर भगवानांनी अर्जुनाला ज्ञानी करण्याकरीता सांगितली आहे, तर ती ऐकून ज्ञान झाल्यानंतर अर्जुनाने युद्ध करून म्हणजे कर्म करून आपल्या शत्रूंचा निःपात केला. यावरून व राजा जनकाचे उदाहरणावरून ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे असाच निष्कर्ष निघतो.

श्री शंकराचार्यांच्या मते ज्ञानी म्हणजे, परमेश्वर प्रज्ञानब्रह्म म्हणजे ज्ञानस्वरूपी असल्याने अशा ज्ञानाशी एक झालेली व्यक्ती व समाजाचे श्रमविभागाप्रमाणे प्रत्येकाकडे आलेले कार्य करणारा म्हणजे कर्मयोगी मनुष्य ज्यावेळेस गृहस्थाश्रमी होतो त्यावेळेस त्याचे कर्म ठरते. त्या अगोदर तो कोणत्याही जातीचा असला तरी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अगर अस्पृश्य नसून उपनयन होण्याचे अगोदर शूद्र व उपनयन झाल्यानंतर ब्रह्मचारीच होतो. उपनयन अर्थात ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य याच्या बाबतीतच शक्य आहे. यावेळेस त्याचे स्वतःचे कर्म असे ठरलेले नसते. ते तो ज्यावेळेस गृहस्थाश्रमी होतो त्यावेळेस ठरते व त्याचा स्वधर्म सुरू होतो. एकदा मानव असंप्रज्ञात समाधीमध्ये जाऊन ज्ञानी झाला म्हणजे तो विवाह करणे शक्य नाही आणि त्याने विवाह जर केला नाही, तर त्याचे स्वकर्मही ठरत नाही. त्यामुळे ज्ञानाला स्वतःचे कर्म असे उरतच नाही. त्याला जे जरूर वाटेल तेच कर्म तो आपाततः करील, स्वतःचे कर्म म्हणून नव्हे, हे त्याने केलेले कार्य अमकेच असेल असेही नाही. शंकराचार्यांना परिस्थित्यनुरूप अद्वैतमते व हिंदुधर्मप्रस्थापना करावीशी वाटली व ती त्याना ते कार्य न करता ईश्वरचिंतनातच वेळ घालवला असता. श्री ज्ञानेश्वर ह्यांनी फक्त ज्ञानेश्वरीच लिहिली. वारकरी संतांची परंपरा नंतर एकनाथांनी चालू केली. श्री रामदासांनी ज्ञान झाल्यानंतर श्री शिवाजी महाराजांच्या मदतीने हिंदुपदपादशाहीची स्थापनाकेली असे ज्ञानोत्तर लोकांचे निरनिराळे कर्म असते; ते ठरलेले नसते; किंबहुना असे जर काही कार्य नसेल तर ते काहीही न करता स्वस्थ बसूनही राहतील. आजही हिमालयात असे कित्येक ज्ञानी समाधी लावून

---

***नवभारत** जानेवारी १९६७ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.



मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काहीही कार्य न करिता बसलेले असणे शक्य आहे. तेव्हा श्री शंकराचार्य ज्ञानोत्तर कर्म शक्य नाही असे म्हणतात. त्याचा अर्थ 'समाजाचे श्रमविभागाप्रमाणे ठरलेले प्रत्येकाचे कर्म', असा घेणे जरूर आहे. लोकमान्य टिळक ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे असे म्हणतात, ते कर्ममार्गाचे दृष्टीने असून अपरब्रह्माशी मानव कर्मयोगाने एकरूप झाला, तरी त्या अपरब्रह्माचे तरी कार्य करण्याशिवाय मार्गच नसतो आणि या अपरब्रह्माचे कार्य वैश्विक श्रमविभागाप्रमाणे ठरलेले असते. तेव्हा कर्ममार्गाचे दृष्टीने ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे एवढेच नव्हे, तर जरूरही आहे. त्याप्रमाणे श्री शंकराचार्य ज्ञानमार्ग दृष्टीने व लोकमान्य टिळक कर्ममार्ग दृष्टीने बोलत असल्याने आपापल्या दृष्टीने दोघेही बरोबरच आहेत.

**श्री शंकराचार्य व लोकमान्य टिळक**

श्री शंकराचार्य व लोकमान्य टिळक या दोघांचे प्रतिपादन भगवान श्रीकृष्णाचे उदाहरणावरून चांगले स्पष्ट होईल. भगवान श्रीकृष्ण अवतार असल्याने त्यांना आपल्या निर्गुण अगर सगुण स्वरूपात एक होणे मुळीच अशक्य नव्हते, पण भगवानांनी श्रीकृष्ण म्हणून यादवाचा पुढारी रूपाने अवतार घेतल्यानंतर ते फक्त यादवाचे पुढारीच नव्हते, तर सोळा हजार स्त्रियांचे पती, अर्जुनादिकांचे मित्र, जरासंध, शिशुपाल, दुर्योधनादिकाचे शत्रुही होते. ते ह्या स्वरूपात जोपर्यंत होते, तोपर्यंत ते स्वतः ज्ञानी होते, तरी त्या त्या परिस्थितीप्रमाणे कर्मे करावीच लागली. कारण त्यांनी स्वतः विवाह करून अज्ञानाप्रमाणे श्रमविभागीय स्वकर्म करण्याकरिताच अवतार घेतला होता. म्हणून त्यांना स्वकर्मसिध्यर्थ अभ्युदयादी ज्या ज्या गोष्टी करणे जरूर होते, ते करण्याशिवाय गत्यंतर नव्हते. असे केले तरच कर्ममार्गाने मोक्ष मिळतो, हे त्यांना आपल्या उदाहरणाने दाखवून द्यावयाचे असल्याने स्वकर्माचा उत्कृष्ट नमुना म्हणून आपली एकंदर वागणूक ठेवणे जरूर होते. तेव्हा लोकमान्य टिळक ह्यांचे कर्ममार्गदृष्टीने त्यांना ज्ञानोत्तर कर्म करण्याशिवाय गत्यंतर नव्हते, किंबहुना न करणे अशक्य होते. भगवान श्रीकृष्णांनी जर सायुज्य मुक्तीची इच्छा केली असती, तर त्यांना आपले कर्तव्यकर्म सोडून देणे जरूर झाले असते. पण त्यांचे अवतारकृत्य नसल्याने अशी इच्छा त्यांना होणे शक्य नव्हते. त्यांनी सायुज्य मुक्तिकरीता संन्यास घेतला असता, तर यादवांचे पुढारीपण, सोळा हजार नऊ बायकांचे पती, अर्जुनादी पांडवांचे मित्र व जरासंधादींचे शत्रू इत्यादी कर्मे आदर्शपणे करणे त्यांना संपूर्णपणे अशक्य झाले असते, तेव्हा श्री शंकराचार्यांचे ज्ञानोत्तर कर्म अशक्य हेही बरोबरच आहे. तेव्हा आपल्या बदलत्या दृष्टिकोनामुळे अंतिम निष्कर्ष बदलत असल्याने उभयता श्री शंकराचार्य व लोकमान्य टिळक बरोबर आहेत असाच निवाडा द्यावा लागेल.

त्याप्रमाणे श्री शंकराचार्य व लोकमान्य टिळक यांचे गीतेवरील प्रतिपादन या दोघांच्या किर्तीस व तत्त्वज्ञानास किंचितही बाध न येता आपण परमेश्वर कृपेने समन्वय करू शकलो. कारण हे कार्य अद्यापपर्यंत अशक्य वाटत होते.

**श्री शंकराचार्य व श्री ज्ञानेश्वर : समाजातील दुरवस्था व ती ध्यानात घेऊन केलेले कार्य**

आता ह्यानंतर श्री शंकराचार्य व श्री ज्ञानेश्वर यांचा याच त-हेने समन्वय करणे कितपत शक्य आहे, हे पहाणे जरुर आहे. श्री ज्ञानेश्वरांनी आपली ज्ञानेश्वरी आचार्यांना म्हणजे श्री शंकराचार्यांना वाट पुसतच लिहिली आहे. तेव्हा ह्या दोन महान व्यक्तींच्या प्रतिपादनात फारसा फरक नाही. पण श्री शंकराचार्यांच्या गीताभाष्यात भक्तीला व ध्यानाला जे गौण स्वरुप आहे ते ज्ञानेश्वरीत नाही. ज्ञानेश्वरीत ह्या दोन्ही गौण भागांना विशेषतः भक्तीला ज्ञानाइतकेच श्रेष्ठ स्थान दिलेले आहे व सायुज्य मुक्ती भक्तीने सुद्धा मिळणे शक्य आहे असे प्रतिपादन केलेले आहे. तसेच त्यानी गीता जी संस्कृतात होती ती प्राकृतात सांगितली. आता ज्ञानदेवांनी गीतेत भक्तीस प्राधान्य दिले ते कितपत बरोबर आहे हे पाहू.

लारिंझर, लासेन, वेबर, गार्ब या व इतर दुस-या ब-याच पाश्चिमात्य पंडितांचे मताप्रमाणे भक्ती ही गीतेने बायबलपासून उचलली आहे असे प्रतिपादन केले आहे. ह्याचा अर्थ असा होतो की, वेदकाली भक्ती नव्हती, ती कल्पना नंतर केव्हातरी आली व ती हिंदुधर्मीयांनी ख्रिश्चन अगर इतर कोणाकडून उसनी घेतली. हे पाश्चिमात्यांचे म्हणणे असले, तरी ऋग्वेदातील निरनिराळ्या देवतांच्या सूक्तात भक्तिभाव ओतप्रोत दिसून येतो. तसेच मनुस्मृतीत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सांगितलेला व गीतेने त्यावरून घेतलेला कर्ममार्गही ऋग्वेदकालात होता असे आपणास म्हणता येईल. हल्ली उपलब्ध असलेली मनुस्मृती मूळ मनुस्मृती नसून भृगुऋषींनी लिहिलेली आहे व ती साधारणपणे इ. स. पूर्व २०० ते इ. स. नंतर २०० ह्या काळात लिहिली गेली आहे, असे पाश्चिमात्यांचे म्हणणे आहे. पण ज्या मूळ मनुस्मृतीच्या संहितेवरून भृगुकृत मनुस्मृती लिहिली गेली ती मूळ मनुस्मृती वेदकालीन असावी असे पाश्चिमात्य पंडित बुहलर यांचे मत आहे (Buhler, Laws of Manu Introduction Page) त्यावरून गीतेतील कर्ममार्ग ऋग्वेदकालीही होता असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. तसेच ऋग्वेदात नासदीय आदी सूक्ते असल्याने ज्ञानमार्गही वेदकालीन होता व ज्ञानमार्गातील सायुज्यमुक्ती ध्यानाशिवाय प्राप्त होत नसल्याने त्यावेळेस ध्यानाचेही महत्त्व होते असे गृहीत धरले पाहिजे. पातंजलीने आपली योगसूत्रे इ. स. पूर्व १०० ते इ. स. नंतर ३० ह्या सुमारास लिहिली असली, तरी ती पूर्वी होती, त्याने ती नंतर ग्रंथित केली असे म्हणण्यास काही हरकत नाही. ह्यावरून ऋग्वेदकालापासून कर्ममार्ग व ज्ञानमार्ग हे दोन मुख्य मार्ग होते आणि भक्ती व ध्यान हे त्यांना पूरक समजले जात असत. जुनी ईश छांदोग्यादी जी उपनिषदे आहेत त्यातही कर्ममार्ग व ज्ञानमार्ग दोन्ही दिलेले आहेत. त्यावरून वेदकाली पुढे दिलेल्या प्रकारचे लोक होते असे अनुमान करण्यास हरकत नाही (१) मनुप्रणीत कर्ममार्गाप्रमाणे वागून आपणास मोक्ष मिळेल या भावनेने वागणारे लोक, (२) कर्ममार्गात राहून संतुष्ट नसल्याने व त्यापासून संपत्ती अगर राज्यसत्ता मिळाल्यानंतर यज्ञयागादी करून जास्तीचे इष्टभोग मिळविण्याचे प्रयत्न करणारे लोक, (३) ज्ञानमार्गावर संपूर्ण विश्वास असलेले व उपजतच वैराग्यशील, अगर कर्ममार्गाचा संपूर्ण उपभोग घेऊन वैराग्य आल्यावर सायुज्यमुक्ती मिळविण्याकरीता संन्यास घेणारे लोक, (४) वैराग्य आलेले नसताना ज्ञानमार्गाप्रमाणे वागण्याची अत्यंत खटपट करून सायुज्यमुक्ती मिळण्यासाठी खटपट करणारे लोक. याप्रमाणे समाजात निरनिराळ्या ध्येयाने प्रेरित होऊन वागणारे निरनिराळे वर्ग होते तरी ते सर्व स्मृती व धर्म ग्रंथातील कायद्याप्रमाणे वागत असल्याने त्यांच्यात संघर्ष उत्पन्न झाला नाही. ही परिस्थिती बुद्धकालापर्यंत होती. इ. स. पूर्व सहाव्या शतकात बुद्ध व जैन धर्माचा उदय झाल्यानंतर ज्यावेळेस वर्णव्यवस्थेवर ह्या धर्माकडून कठोर टीका सुरू झाली त्यावेळेस खरा संघर्ष ह्या नवीन धर्मतत्त्वज्ञानात व जुन्या हिंदुधर्मात सुरू झाला. हिंदुधर्मात ह्या वेळेस मनूच्या समाजव्यवस्थेप्रमाणे चालणारे लोक होते व त्यांच्या ध्यानाच्या देवता ब्रह्मणस्पती, विष्णु व रुद्र होत्या तसेच त्यांच्यात उमा , आदिती, इला, सरस्वती, भारती इत्यादी स्त्रीदेवताही असाव्यात. हे सर्व कर्ममार्गी आपल्या स्वधर्माने संपत्ती मिळवीत व त्यांचे जास्तीचे इष्ट अगर काम्य कर्म असेल त्याच्या प्राप्तीकरता यज्ञयागादी कर्मे करीत. या यज्ञयागादी कर्मांनी काही अपूर्व शक्ती त्या कर्ममार्ग्यांना मिळत असावी म्हणूनच ती काम्यकर्मे मोठ्या प्रमाणात होत होती. ह्या वेळचे त्याचे उपास्यदेव अग्नि, इन्द्र, वरुण इत्यादी होते. ह्या यज्ञापासून होणा-या अपूर्व प्राप्तीचे स्वरूप काय होते हे सांगणे कठीण आहे. पण ते एखादे अस्त्र (अग्नेयास्त्र, वायव्यास्त्र) अगर शक्ती असावी त्यामुळे त्या मानवाचे ईप्सित साध्य होत असे. देव मानव इत्यादी या शक्ती समाजाच्या फायद्याकरीता वापरीत. यज्ञयागादी केल्यानंतर ही शक्ती अगर अस्त्र कोणालाही देव अगर असुर ह्यांना मिळत असे, असे दिसते. यानंतर ज्ञानमार्गी ह्यांचा मार्ग सरळ होता. जन्मतः वैराग्य अंगात बाणले असल्याने किंवा कर्ममार्ग आचरून इंद्रियशांती घडून वैराग्य बाणल्याने हे ज्ञानमार्ग आचरून सायुज्य मुक्ती मिळवण्याची खटपट करीत. परंतु सर्वात विशेष लक्षात राहण्यासारखे लोक म्हणजे वैराग्य अंगात बाणले नसताना अट्टाहासाने ज्ञानमार्गाने जाणारे लोक होत. ह्यांचे इंद्रियदमनाने जसे जसे मोक्षसाधनाचे टप्पे साध्य होत, तशी तशी त्यांची मानसिक शक्ती वाढत असे; व आनंदमय समाधीप्रत ते पोचल्यानंतर त्यापुढील टप्पे सस्मित, संप्रज्ञात हे मिळवण्याच्या खटपटीत त्यानाही काही विलक्षण सिद्धी प्राप्त होत असत. अशा वेळेस वैराग्य अंगात बाणलेले असल्याने त्या सिद्धीच्या मागे लागून त्यापासून आपणास सामाजिक कोणता फायदा मिळविता येईल ह्याकडे त्यांचे लक्ष लागे. त्यामुळे ते ज्ञानमार्गापासून विचलित होत. असे असले तरी त्यांचा मोक्षसोपान धर्माप्रमाणे यमनियम


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

